कै० द. ग. सारोळकरकृत

# राजांचा राजा



कृष्ण :– सात्यकी ! आतांच्या आतां रथ तयार करा; भक्तांच्या सहाय्याकरितां मला गेलेंच पाहिजे.

# राजांचा राजा

(गद्यपद्यात्मक तीन अंकी पौराणिक नाटक)

: लेखक :

दत्तात्रय गणेश सारोळकर

—: प्रकाशक :—

बलवन्त पुस्तक भाण्डार,
गिरगांव नाका, मुंबई नं. ४



बलवन्त
प्रकाशन
गिरगांव मुंबई

क्रमांक ४१

आवृत्ति दुसरी

आक्टोबर १९५४

किंमत १॥ रुपया

'**राजांचा राजा**' या नाटकाचा प्रथम प्रयोग **महानंदा संगीत मंडळीनें** रिपन नाटकगृहांत रविवार ता. १ मार्च १९३१ रोजीं करून दाखविला. त्यावेळीं पुढील नटनटींनीं भूमिका केल्याः—

| | | |
|---|---|---|
| **पौंड्रक** | ... ... | श्रीमती महानंदाबाई |
| **श्रीकृष्ण** | ... ... | श्रीमती काशीबाई |
| **शिशुपाल** | ... ... | शांताराम राजे |
| **केशीराज** | ... ... | नारायण कोठारी |
| **सात्यकी** | ... ... | गणपतराव फडके |
| **विचित्रवीर्य** | ... ... | पाटील |
| **वृषभकर्ण** | ... ... | मध्वनाथ पालव |
| **नारद** | ... ... | कुमारी मधुबाला |
| **पुष्पवती** | ... ... | श्रीमती शामाबाई |
| **अनुमती** | ... ... | कुमारी मेनका |
| **धेनुमती** | ... ... | प्रेमबाला |
| **डायरेक्टर** | ... ... | श्री. त्र्यंबकराव प्रधान |
| **संगीत–शिक्षक** | ... | अबदुल मजीद खासाहेब<br>प्रा. के. वाय्. काळे |
| **हार्मोनियम मास्टर** | ... | पांडुरंग देवकर<br>केशवराव पवार |
| **तबलजी** | ... ... | हरिश्चंद्र बांदवडेकर |
| **स्टेज् मॅनेजर** | ... ... | काशिनाथ दप्तरदार |
| **जनरल मॅनेजर** | ... ... | जी. के. परचुरे |



# माझें हृद्गत

'**राजांचा राजा**' हें गद्यपद्यात्मक पौराणिक नाटक, हरिवंशांतील पौंड्रक कथेच्या आधारानें लिहिलें आहे. यांतील मध्यवर्ती कल्पना म्हणजे '**पुरुष व पुरुषोत्तम**' यांच्यांतील लढा होय. सदरहू कथानक मी चित्रपटाकरतां म्हणून तयार केलें होतें व माझ्या कांहीं परिचितांना हें सांगून त्याची चित्रपटकथा तयार करून दिली. त्या सज्जन (!) परिचितांनीं काळोखाच्या पडद्याकरतां तयारहि केलें. दुःख इतकेंच कीं, पुढें त्या गृहस्थांनीं व्यवहारचातुर्यानें माझ्या भोळ्या स्वभावाचा फायदा घेऊन '**आपलेपणा**' दाखविला. फसण्यांत, फसविणाराच मुत्सद्दी व प्रामाणिक ठरतो आणि फसणारा मूर्ख ठरतो हा अनुभव परिचित गृहस्थांनीं या बाबतींत मला चांगलाच पटवून दिला. एका पवित्र क्षेत्रीं कथानकाच्या मालकीच्या अतिक्रमणाचा अपवित्रपणा चालू असतां मी मौज साप्ताहिकांतून त्यावर प्रकाश पाडला; परंतु लक्ष्मीच्या दारांतून तिचें दर्शन घेणाऱ्या माझ्यासारख्या सर्वमान्य अकिंचनाला कज्जेदलालांचे उंबरठे झिजवून न्यायमंदिराची पायरी चढतां येणें अशक्य झालें.

वरील गोष्ट घडल्यानंतर, गेल्या महिन्यांत माझे मित्र श्री. **बापूसाहेब ढगे** यांनीं **महानंदा संगीत मंडळी**करतां माझ्याजवळ एका नाटकाची मागणी केली व मागणी करतांना चित्रपटाकरतां तयार केलेल्या कथानकावरच नाटक लिहून द्या असा आग्रह धरला. श्री. ढगे यांना वरील हकीकत पूर्णपणें अवगत होती; अर्थात् मी त्याच कथानकावर नाटक लिहिण्याचें कबूल केलें. परंतु त्याच वेळीं दुसरी एक तात्त्विक अडचण माझ्यापुढें दत्त म्हणून उभी राहिली. ती अडचण म्हणजे पुरुषांनीं पुरुषांच्या व स्त्रियांनीं स्त्रियांच्याच भूमिका कराव्या ही होय. हें माझें मत सुमारें अठरा वर्षांपूर्वी मी एका नाट्यविषयाला वाहिलेल्या मासिकांत प्रसिद्ध केलें होतें. अद्यापहि मी त्या मतापासून निवृत्त झालों नाहीं.

महानंदा संगीत मंडळींत पुरुषांच्या कांहीं भूमिका स्त्रिया करतात ही गोष्ट मला नापसंत असल्याचें मी श्री. ढगे यांना कळविलें. मी या मंडळीला नाटक देणार असें जाहीर होतांच कित्येकांनीं मला नांवानें व निनांवानें पत्रें पाठवून तुम्हीं आपल्या तत्त्वापासून निवृत्त होत आहां याची जाणीव करून दिली. मराठी नाटक मंडळींनीं उर्दू नाटकें बसवूं नयेत असा ठराव नाट्यसंमेलनांत

मांडल्यामुळें जशा कांहीं उर्दू खेळ करणाऱ्या मराठी नाट्यसंस्था मला 'शत्रू' सारख्या लेखूं लागल्या, तशाप्रमाणें स्त्री–संगीत–मंडळीच्या रंगभूमीवर माझीं नाटकें होऊं लागल्यावर मला प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष स्त्रियांच्या पुरुषभूमिकेसंबंधीं प्रश्न विचारण्यांत येऊं लागले. मनोहर स्त्री–संगीत–मंडळीच्या रंगभूमीवर गेल्या सालीं माझीं जीं चार नाटकें आलीं त्यांत माझ्या वरील तत्त्वाप्रमाणें श्री. चिवटे यांनीं वागणूक केली. त्याचप्रमाणें महानंदा संगीत मंडळीनेंहि सुधारणा करावी म्हणून मी या मंडळीच्या चालकांशीं चर्चा केली. परंतु आज नाहीं उद्यां तुमच्या मताप्रमाणें आम्हीं खात्रीनें व्यवस्था करूं असें चालकांनीं मला आश्वासन दिलें! त्या आश्वासनावर विश्वास ठेवून मी हें नाटक मंडळीला देण्याचें कबूल केलें! मला आशा आहे कीं मंडळीचे चालक या आश्वासना-प्रमाणें आपल्या रंगभूमीची सुधारणा करतील.

दुसऱ्या एका गोष्टीचा येथें उल्लेख करणें क्रमप्राप्त आहे. ती गोष्ट म्हणजे महानंदा संगीत मंडळीविषयीं होय. आपल्या महाराष्ट्रांत संगीत परंपरा सुरू झाल्यापासून सहा स्त्री–संगीत–नाट्यसंस्था निर्माण झाल्या. प्रारंभीं पुरुष संस्थेंतून स्त्रिया, स्त्रीभूमिका घेत असल्याचें मराठी रंगभूमीचा इतिहास साक्ष देतोच आहे. संगीताच्या पूर्वीं पौराणिक नाटक मंडळ्यांतून स्त्रियांची एखादी दुसरी भूमिका स्त्री घेत असे. पण या कंपन्या स्त्री–कंपन्या म्हणून गणल्या जात नसत. अगदीं पहिली स्त्री–संगीत–मंडळी म्हटली म्हणजे बेळगांवकर स्त्री–संगीत मंडळी होय. या मंडळींत चंद्रगिरी कुटुंबाची पांचसहा मंडळी होती. त्यांनीं आपल्या भगिनींच्या मदतीवर त्या मंडळीची प्राणप्रतिष्ठा केली. यांत पुरुषांची भूमिका स्त्रियाच घेत असत. त्या मंडळीनें आपल्या कारकीर्दीत लौकिक व आर्थिक असें दुहेरी यश संपादन केल्याचें महाराष्ट्राला विदित आहे. त्यानंतर सातारकर स्त्री–संगीत–मंडळी शाहूनगरांत जन्माला आली. याहि मंडळीनें आपली चमक चांगल्या रीतीनें दाखविली. सध्या ही मंडळी मनोहर स्त्री–संगीत मंडळीच्या नांवानें विद्यमान आहे. याच्यानंतर सुमारें दोन वर्षांपूर्वी नूतन संगीत विद्यालयानें एक नाट्यशाखा काढली. ह्या शाखेंत मुख्य स्त्रियांच्या भूमिका स्त्रियाच घेतात परंतु सर्व स्त्रीभूमिकांकरतां स्त्रिया अद्याप ठेवण्यांत आल्या नाहींत. कांहीं स्त्रीभूमिका लहान मुलाकडून करवून घेण्यांत येतात. या मंडळींत मुख्य पुरुषाच्या भूमिका पुरुषांना देण्यांत येतात ही गोष्ट अभिनंदनीय अशी आहे. परंतु आलिंगनादि प्रकार दुरून करण्याचा परकेपणा

दूर झाल्यास बरें होईल. पुण्यप्रभाव नाटकांत असला परकेपणा मी प्रत्यक्ष पाहिलेला आहे.

या नंतर स्त्री–संगीत–मंडळी म्हटली म्हणजे महानंदा संगीत मंडळी होय. ही मंडळी काढण्याचा उद्देश चालकांनीं जो निवेदन केला तो असाः—सध्यांच्या गुणवतींच्या जीवनक्रमाची स्थिति पाहतां व सुधारणेचें पाऊल पुढें पुढें पडत असतां आपल्या गुणीजन समाजांतील स्त्रियांची योग्य ती स्थिति सुधारून आपल्या समाजावरील प्रवाद खोडून टाकून अभिनय, संगीत व स्वरूप यांचा योग्य उपयोग करून त्या द्वारें आर्थिक व लौकिक दर्जा वाढवून, कलेची सेवा करून पतित भगिनींच्या उद्धाराला योग्य तो हातभार लावण्याकरतां ही मंडळी स्थापन करण्यांत आली आहे. कलेचें पोषण व पतिता भगिनींचा उच्च दर्जा हीं दोन ध्येयें तूर्त या नव्या संस्थेच्या डोळ्यांपुढें आहेत.

ज्या समाजांतील नटी या संस्थेंत आहेत त्या समाजांत दिवसेंदिवस सुधारणा होत चाललेल्याच आहेत. शिक्षणाची आवड उत्पन्न झाली असून 'पंकांतून' वर येण्याचा योग्य मार्ग या समाजानें अंगिकारलेला आहे ही अत्यंत अभिमानाची गोष्ट आहे. संस्थेनें ठरविलेल्या ध्येयाप्रमाणें जर त्याची पूर्तता केली तर पतिता भगिनींचा नैतिक व आर्थिक प्रश्न सहज सुटेल आणि कलेच्या गुणावर शील व संस्कृति यांचें संरक्षण करून कलावानांचा समाजांत जो दर्जा आहे त्याहिपेक्षां अधिक उच्च होईल यांत शंकाच नाहीं.

'**राजांचा राजा**' हें नाटक रंगभूमीवर आणण्याच्या कामीं श्रीमती **महानंदाबाइ**, श्री. **त्र्यंबकराव प्रधान**, श्री. **मु. लि. जोशी** आणि श्री. **बापूसाहेब ढगे** यांचें मला अनमोल साहाय्य झालें आहे. संगीत विभागाचें सर्व श्रेय माझे मित्र श्री. **के. वाय. काळे** व प्रो. **अबदुल मजीद खांसाहेब** यांसच आहे.

'**मौज व प्रभात**' या नियतकालिकांच्या नित्य लेखनांत श्री. **पां. म. भागवत** (धनी) श्री. **न. रा. जोशी**, (व्यवस्थापक) यांनीं सवड दिली नसती तर हें नाटक इतक्या लवकर लिहून झालेंच नसतें. तसेंच श्री. **रेळे, राजवाडे, अनंतरावजी गद्रे, नारायणराव मोरे, श्रीपतराव उपरे** व **दादासाहेब परचुरे** यांचाहि मी अत्यंत ऋणी आहें.

**दत्तात्रय गणेश सारोळकर.**

# श्री. सारोळकरकृत पुस्तकें.

## रंगभूमीवर आलेलीं नाटकें.

---

१ जनता—जनार्दन.

२ अरुण—प्रभा.

३ गरीबांचा सम्राट.

४ हाच तो शास्त्री.

५ पेशव्यांचा पेशवा.

६ पराक्रमाचा पाया.

७ शुभमंगल.

८ दर्यादौलत.

९ वीर सौभद्र.

१० सम्राटाचा सूड.

११ पुन्हां हिंदू.

१२ राजांचा राजा.

**कादंबऱ्या.**

१ श्रीमंताची पोर.

२ रंगेल राजकुमार.

३ सतींचा हंबरडा.

**राजकीय**

१ भारतमातेची श्रेष्ठता.

२ स्वातंत्र्याच्या कहाण्या.

**संकीर्ण.**

१ मराठीची पाईकी.

**लघुकथा.**

१ एकादशी.

---

**सामाजिक.**

१ आमचा समाज व समाजशास्त्र.

२ सुधारलेलें विवाहशास्त्र.

श्री

# राजांचा राजा

## अंक पहिला

### प्रवेश पहिला

**नारदः—**

**पद** ( राग—खमाज, ताल—केरवा )

**परममंगल स्तवन सुखकरी जगा सुनंदन ॥**
**पुण्यप्रद अच्युसुत भक्ता यदुकुल नंदन ॥**
**रमण नुरवी न अशुभ कीर्तन ॥ धृ० ॥**
**विश्वरुप अनुरुप ऐसा विधीविलासी ॥**
**सुजन गुणीजन पूजित चरण ॥ १ ॥**

भाविक भक्तांची पवित्र श्रद्धा परमेश्वराची प्राप्ति करून देते. प्रभूचं गुणकीर्तन संसारी जनांना नवसंजीवन देतं. भक्तांच्या भक्तीनं परमेश्वरी प्रसादाचा महोत्सव त्रिखंडांत चालू असतो. पवित्र पुरुषोत्तमाच्या परम मंगल जयघोषानं भक्त आपली भक्तवाणी अमृतासारखी करतात. परंतु या भक्तांना आणि भक्तवत्सलाला, आसुरी वृत्तीच्या लोकांकडून विरोध केला जातो! जगाच्या आदिकालापासून पुरुष आणि पुरुषोत्तम यांच्यांतला लढा चालू आहे. असा लढा या पौंड्र देशांत चालू असल्याचं मला समजलं. या लढ्यांत आसुरी वृत्तीच्या राजाला हातीं धरून पुरुष कीं पुरुषोत्तम हा महत्त्वाचा प्रश्न मी सोडविणार आहें. नमो भगवते वासुदेवाय।

**वृषभकर्णः—**कोणरे तूं! आणि आमच्या पौंड्रपुरांत कसलं गुणवर्णन करतो आहेस?

**नारद्**ः—आपण कोण ?

**वृषभ०**ः—मी हुकमाचा ताबेदार आहें.

**नारद**ः—हुकमाचा ताबेदार ?

**वृषभ०**ः—डोकं काय खाजवतोस ? तुझ्या डोक्यांत हा शब्द मुळींच शिरणार नाहीं. आम्हा राजकारणी लोकांशिवाय याच्यांतली मख्खी कुणालाहि समजणार नाहीं.

**नारद्**ः—बरोबर आहे. आम्हां भगवंताच्या भक्तांना तुमचं राजकारण घेऊन काय करायचं आहे ?

**वृषभ०**ः—तुला राजकारण मुळींच कळायचं नाहीं; तें कळायला माझ्या-सारखा चलाख मेंदूचा वृषभकर्णच पाहिजे.

**नारदः**—पण काय रे, तूं कुणाचा सेवक ?

**वृषभ०**ः—भगवान् वासुदेव पौंड्रकमहाराज यांच्या हुकमाचा ताबेदार.

**नारदः**—भगवान् वासुदेघ !

**वृषभ०**ः—हो–हो, भगवान् वासुदेव !

**नारद्**ः—पण तुझा धनी भगवान् केव्हां झाला ?

**वृषभ०**ः—तें भगवानाला माहीत. आम्ही हुकमाचे ताबेदार लोक असल्या पंचायतींत पडत नाहीं. आमचा हुकूम बरा आणि आम्ही बरे !

**नारद्**ः—मला तुझ्या भगवान् धन्याची भेट घ्यायची आहे.

**वृषभ०**ः—ठीक आहे; पण आपलं नांव काय ?

**नारद्**ः—नमो भगवते वासुदेवाय.

**वृषभ०**ः—वा ! हें नांव आमच्या महाराजांना फारच आवडेल.

**नारद्**ः—तुझ्या महाराजांची आवड तुला चांगलीच माहीत आहे तर !

**वृषभ०**— मी हुकमाचा ताबेदार आहें; महाराजांची आवडच काय पण त्यांचीदेखील मला चांगली माहिती आहे.

**नारद**ः—भगवान् वासुदेव काय करीत आहेत ?

**वृषभ०**ः—केशीराजाच्या स्वागतांत ते तूर्त गुंतले आहेत. महाराज आणि त्यांच्याकडे आलेले पाहुणे नृत्य–गायनांत गुंग होऊन गेले आहेत.

**नारद**:—बरं तर! त्यांना कळीव कीं, मी आलों आहें.

**वृषभ०**:—मी हुकमाचा ताबेदार आहें. कळवतों त्यांना मी आलों आहें!

[ जातो ]

**नारद**:—भगवान् वासुदेव! छान! पौंड्रकाच्या मनांत भगवान् श्रीकृष्णा-विषयींचा असलेला मत्सर या योगानं चांगलाच प्रत्ययाला आला आहे. प्रत्यक्ष पुरुषोत्तमाशीं या पुरुषानं स्पर्धा मांडली आहे. एका अर्थी हें बरंच झालं. पुरुष पुरुषोत्तम या तत्त्वावरील नाटकाला हें कथानक मला फारच उपयोगी पडेल. या नव्या भगवानाला आपला अंतस्थ हेतू कळूं न देतां, त्याचा मत्सराग्नि खूप भडकवून द्यावा आणि शेवटीं पुरुषोत्तमाच्या स्पर्धेचा परिणाम काय होतो हें सर्व जगाला पटवून द्यावं! या जगांत काय काय खेळ चालले आहेत पहा!

**पद** ( राग—भूप. ताल—एकताल )

**जगत क्रीडन पुण्यधाम ॥ लीला करी क्षूद्र नाम ॥**
**रिझला मनीं शुद्ध सुजन ॥ विविध खेल नाचे ॥ धृ० ॥**
**स्पर्धा दैवी विशाल ॥ करित मनुज नित्य काल ॥**
**वंचिती नियंता नियम साधनाचे ॥ १ ॥**

---

## प्रवेश दुसरा

**स्थळ**—पौंड्रकाचा महाल.

**पात्रें**—पौंड्रक, केशी, शिशुपाल, वृषभ, विचित्रवीर्य, नारद

[ नृत्यांगना नृत्य करीत आहेत. ]

**शिशु०**:—पौंड्रकराज! आमच्या स्वागताकरतां आणि मनरंजनाकरतां आपण फारच श्रम घेतलेत. पण मी स्वागतसमारंभापासून बारकाईनं पाहतों आहें कीं, आपल्याला यामुळें व्हावा तसा आनंद झालेला दिसत नाहीं. पौंड्रक-पूरच्या सम्राटाला अशा कोणत्या चिंतेनें व्यापलं आहे?

**केशी०**:—आमच्यासारखे महाबलिष्ठ मित्र तुमच्या मदतीला असतांना पौंड्रक सम्राटाला कोणती चिंता व्यापणार आहे? बोला! सम्राट बोला; एका निमिषांत आपल्याला चिंतामुक्त करून टाकतों. या केशीराजाचा पराक्रम

आपल्याला माहीत नाहीं काय ? जरासंधवधाच्या वेळीं हा केशीराज हजर असता तर आपला मित्र जरासंध त्या भीमाच्या तावडींतून खात्रीनें सुटला असता.

**शिशु०**:—नरकासुराच्या स्वारीची गुणगुण जर या शिशुपालाला समजली असती, तर नरकासुराच्या ऐवजीं त्या कृष्णाचाच वध या शिशुपालानें केव्हांच केला असता.

**केशी०**:—मल्लयुद्धाची घमेंड मारणाऱ्या कृष्णाला आम्ही केव्हांच निर्वाण-पदाला पोंचवलं असतं !

**विचित्र०**:—तत्त्व मान्य, तपशील अमान्य !

**शिशु०**:—बोला ! पौंड्रकसम्राट्, बोला ! अशी कोणती काळजी आपल्याला लागली आहे ?

**पौंड्रकः**—शिशुपाल, केशीराज, या पौंड्रकाच्या कणखर अंतःकरणाची तुम्हांला जाणीव आहेच. हा पौंड्रक अशा कमकुवत मनाचा अगर लुसलुशीत अंतःकरणाचा नाहीं ! या बाहूंत इतका पराक्रम आहे कीं, नुसत्या मनगटाच्या वरवंट्यांनीं कोणताहि रथीमहारथी निर्वाणपदाला पोंचूं शकेल. पौंड्रकाच्या नेत्राचा कटाक्ष सामान्य प्रतिस्पर्ध्याला भीतीनं कांपरं भरायला लावील. ही गदा, अतुल पराक्रमी वीरांच्या मस्त मस्तकांचे शतशः तुकडे करील. भीमाला, त्या अर्जुनाला आणि त्यांच्या त्या घमेंडखोर कृष्णाला, आपल्या सामर्थ्याची घमेंड आहे; पण हा पौंड्रक त्या साऱ्यांची घमेंड एका निमिषांत उतरून टाकील. आम्हीं कौरवपक्षपाती लोक म्हणजे नेभळट आहोंत असा त्या पांडवांचा आणि त्या गवळयाच्या पोराचा समज झालेला आहे. आम्हीं मनांत आणूं तर ब्रह्मांडालाहि पळतां भुई थोडी होईल. शिशुपाल, आमचा पराक्रम या घुंगुरट्यांना अजून माहीत नाहीं.

**पद** राग—सारंग. ताल—त्रिताल.

**लोकीं शूर वीर नर हा मिरवी नरवर ॥ ध्रु० ॥**
**विक्रम दावीत अरीगण नाशी ॥**
**विजय घेई लोळण मम पायीं ॥**
**असी करीं तळपत अनुदिनीं ॥**
**प्रबल चपल विमल भयकर महिवर ॥ १ ॥**

**शिशु०**:—पौंड्रक महाराज, या पोरासोरांच्या वल्गना कुठपर्यंत चालणार! जोंपर्यंत मत्त केसरी या जंबुकांच्या दृष्टीला पडला नाहीं, तोंपर्यंतच त्यांच्या वल्गना. केसरीची नुसती गगनभेदी गर्जना ऐकली कीं, त्या गर्जनेच्या गडगडाटानंच सर्व जंबुकांच्या तोंडचं पाणी पळेल.

**विचित्र०**:—तत्त्व मान्य, तपशील अमान्य.

**वृषभ०**:—मी हुकमाचा ताबेदार आहें. (त्याच्या तोंडावर हात ठेवतो)

**केशी०**:—आमचा अतुल पराक्रम त्यांना कुठून माहीत असणार! त्या पांडवांच्यापेक्षां माझा त्या कुटिल कृष्णावर जास्त राग आहे. त्याची ती द्वारका समुद्रांत बुडवून टाकल्याशिवाय माझं अंतःकरण शांत होणार नाहीं.

**पौंड्रक**:—केशीराज, याच कल्पनेनं माझ्या अंतःकरणांत तांडवनृत्य चालविलेलं आहे. तुमच्या मनांत द्वारकेचा प्रश्न घोळत असला, तरी माझ्या अंतःकरणांत कृष्णनाशाचा प्रश्न घोळतो आहे. ज्या दिवशीं त्या गवळ्यांच्या पुढाऱ्याला मी निर्वाणपदाला पोंचवीन त्याच दिवशीं हें शल्य माझ्या अंतःकरणांतून जाईल. उठल्यासुटल्या हा आम्हासारख्यांना पाण्यांत पाहतो. गवळ्याच्या झोंपडींत राहणारा हा दरिद्र्यांचा दरिद्री आम्हां सम्राटांशीं प्रतिस्पर्धा करतो. कुठं आम्ही राजाधिराज आणि कुठं हा गरीब गवळी! कांहींतरी जादूटोणा करून हा आपली लोकप्रियता वाढवतो आहे.

**केशी०**:—अहो, इतकंच काय, पण हा आपल्याला प्रत्यक्ष परमेश्वर समजतो आहे!

**पौंड्रक०**:—परमेश्वर! त्याला परमेश्वर समजायचं! मग आमच्या या भावी सेनापतींना, या विचित्रवीर्यांना परमेश्वर कां समजूं नये?

**विचित्र०**:— तत्त्व मान्य, तपशील अमान्य.

**पौंड्रक**:—तो कसा?

**विचित्र०**:—महाराज, कोणीहि मला परमेश्वर करावं. मला परमेश्वर होण्याचं तत्त्व मान्य आहे, परंतु परमेश्वर बनण्याचा तपशील मात्र अमान्य आहे. कोणतेंहि तत्त्व मान्य पण तपशील अमान्य हें माझं राजकरण आहे.

**पौंड्रक**:—पुरे करा तुमचं पांडित्य.

**विचित्र०**:—तत्त्व मान्य, तपशील अमान्य.

**शिशु०**:—पौंड्रकराज, त्या कृष्णाचा नायनाट कसा करायचा याचा आपल्याला शक्य तितक्या लौकरच विचार केला पाहिजे.

**केशी०**:—यांत विचार कसला करायचा! तुम्ही–आम्ही सगळ्यांनीं मिळून याच्या विरुद्ध आरडाओरडा करायचा. कृष्ण हा परमेश्वर नसून एक भोळ्या-भाबड्या भक्तांना फसविणारा अधमाधम आहे, अशी रणभेरी सर्वत्र वाजवायची, चहूंबाजूंनीं त्याच्या विरुद्ध लोकमत निर्माण करायचं!

**पौंड्रकः**—अशानं कृष्णद्वेषाचं विष सर्वत्र ठिकाणीं पसरून दिलं, तर त्यानें कृष्णाची बडेजावी कमी होईल असं मला वाटत नाहीं. त्याला या जगांतून नाहींसा करण्याकरतां त्याच्याशीं झुंज खेळायला एक चांगलाच प्रतिस्पर्धी उभा केला पाहिजे. एखाद्याची वाढती लोकप्रियता ओहटीला लावण्याकरतां दुसराच एक प्रतिस्पर्धी निर्माण करणं ही राजनीति आहे. या राजनीतीच्या जोरावर आपण कृष्णाशीं प्रतिस्पर्धी डाव खेळल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

**शिशु०**:—ही युक्ति मला फारच आवडली. मथुराधीश कंस राजानं जर असाच प्रतिस्पर्ध्याचा डाव टाकला असता तर आजच्या घटकेला हा कृष्ण यमुनेच्या विशाल उदरांत नाहींसा होऊन कंसराज मथुरेच्या सिंहासनावर तुम्हां आम्हांला दिसले असते.

**केशी०**:—मग या बाबतींत कसं काय करायचं!

**नारदः**—[ प्रवेश करतो ] राजा! मी तुमचा पाठीराखा असल्यावर अशी चिंता कसली? नमो भगवते वासुदेवाय!

**पौंड्रकः**—मुनिवर्य, अगदीं वेळेवर आलांत.

**नारदः**—मी नेहमींच अशा वेळा साधून येत असतों.

**पौंड्रकः**—बसा या आसनावर.

**नारदः**—भटकणाऱ्या माणसाला आसनाचा मोह काय बरं कामाचा! ती बसण्याची गोष्ट राहूं दे. तुम्ही सारे आतांपर्यंत असेच बसलांत म्हणूनच कृष्णाची पुंडाई माजली. आज तो तुम्हां सर्वांच्यापेक्षां फार पुढें गेला आहे. त्याच्या वाढत्या वैभवाला जर वेळींच तुम्ही विरोध केला असतात तर—

**पौंड्रकः**—तर काय? हा आज इतक्या स्थितीला आलाच नसता असंच ना तुमचं म्हणणं —

**नारदः**—तुम्ही राजे कितीतरी समजूतदार आहांत. इतका समज तुम्हांला आहे याचा मला हेवाच वाटतो; आणि म्हणूनच अशा समजूतदार राजांची कांहीं तरी सेवा करावी म्हणून भटकण्याचा कार्यक्रम तहकूब करून मी इथं आलों आहें. पहा माझा कांहीं उपयोग करून घेतां आला तर !

**शिशु०ः**—तुमच्यासारखा सल्लागार आम्हांला हवाच आहे.

**केशी०ः**—आपल्यासारखा कारस्थानी आमच्या फारच उपयोगी पडेल.

**नारद०ः**—कसला कारस्थानी ! लोकांनीं माझ्या नांवाचा उगीच बोभाटा केला आहे. ज्यांना त्यांना मी कळलाव्या आहें असं वाटतं ! मनुष्य आपल्या कृतीनं मरतो आणि दोष मात्र माझ्यासारख्या भणंग भिकाऱ्यावर येतो.

**पौंड्रकः**—मुनिवर्य, तो विवाद जाऊं द्या. आम्हांला त्या कृष्णाचा सूड उगवायचा आहे; तेव्हां अशी कांहीं युक्ति सांगा कीं, आम्ही सर्व त्यांत विजयी होऊं !

**नारदः**—प्रश्न मोठा विचार करण्यासारखा आहे.

**शिशु०ः**—आम्हीदेखील त्याच विचारांत गढून गेलों आहोंत.

**नारदः**—युक्ति आहे पण ती पौंड्रकाशिवाय दुसऱ्या तिसऱ्याला साधणार नाहीं.

**पौंड्रकः**—बोला, मुनिवर्य बोला, हा पौंड्रक ती सहजच सफल करील.

**शिशु०ः**—कुणीकडून तरी त्या कृष्णाचा नायनाट झाला पाहिजे.

**नारदः**—शिशुपाल, कृष्ण तुझ्या प्रेमाचा प्रतिस्पर्धी आहे हें मी विसरलों नाहीं. रुक्मिणीच्या लग्नाचा डाव श्रीकृष्णानं जिंकला त्यामुळें तुला वाईट वाटणारच. प्रेमाच्या युद्धांतली स्पर्धा फारच भयंकर असते.

**विचित्र०ः**—तत्त्व मान्य, तपशील अमान्य.

**केशी०ः**—शिशुपालाच्या लग्नाच्या बाबतींत कृष्णावर रोष असेल, पण पौंड्रक महाराजांचा आणि आमचा रोष राजकीय स्वरुपाचा आहे.

**पौंड्रकः**—तो आपल्याला परमेश्वर समजतो-पुरुषोत्तम समजतो, जगाचा रक्षणकर्ता समजतो, ही गोष्ट आम्हां राजेमहाराजांना मान्य नाहीं. त्याच्यांत आणि आमच्यांत जमीन-अस्मानाचें अंतर आहे.

**नारद**ः—अगदीं सर्वांना पटण्यासारखी गोष्ट बोललास राजा ! कृष्णाचं निर्मूलन करण्याकरितां तुम्हीं अगदीं उतावीळ झालां आहांत ना ?

**पौंड्रक**ः—होय !

**शिशु०**ः—लौकर युक्ति सांगा.

**केशी०**ः—अगदीं असेच निघतों.

**नारद**ः—थांबा, घाई करूं नका. उतावीळपणा चांगला नाहीं. तारुण्यांतला उतावीळपणा वृद्धपणीं पश्चात्तापाला कारणीभूत होत असतो.

**विचित्र०**ः—तत्त्व मान्य, तपशील अमान्य.

**नारद**ः—तुम्हांला कृष्णाला कोणीतरी प्रतिस्पर्धी उभा केला पाहिजे.

**पौंड्रक**ः—कबूल, अक्षरशः कबूल !

**शिशु०**ः—पण करायचं कुणाला ?

**केशी०**ः—कृष्णाशीं प्रत्येक गोष्टींत प्रतिस्पर्धा करील असा आमच्या राजमंडळांत आहे तरी कोण ?

**नारद**ः—कोण ! अहो जवळच्या माणसाची शेजाऱ्याला ओळख नसते, आणि आप्तांना त्याची योग्यता कळत नाहीं. पौंड्रकराजा हा प्रत्येक बाबतींत श्रीकृष्णाशीं स्पर्धा करायला योग्य आहे. कृष्णाच्या बापाचं नांव वासुदेव, याच्याहि पित्याचं नांव तेंच. तो परमेश्वराचा अवतार, हाहि परमेश्वराचा अवतार. शिवाय दोघेहि क्षत्रियच. अशी चांगली जोड असतांना दुसरा तिसरा प्रतिस्पर्धी पहातां कशाला ?

**शिशुपाल व केशी०**ः—कबूल, अक्षरशः कबूल.

**नारद**ः—उद्यांपासून, नव्हे आजपासून तुम्ही सर्वजण यालाच श्रीकृष्ण म्हणा आणि होऊं द्या तुमच्या लढ्याला सुरवात. काय राजा ! आहे कां माझी युक्ति कबूल !

**पौंड्रक**ः—आहे म्हणून काय विचारतां ! कबूल आहे. आपल्या युक्तीप्रमाणें मी आजपासून कृष्ण म्हणून मिरविणार. वृषभकर्ण—

**वृषभ०**ः—हुकमाचा ताबेदार तयार आहे.

**पौंड्रक**ः—सेनापतींना मला भेटायला सांगा.

**वृषभ०**:—मी हुकमाचा ताबेदार आहें. निरोप बिनचूक सांगेन. ( जातो )

**पौंड्रक**:—मुनिवर्य बसा, मी आपला सत्कार करतों.

**नारद**:—नको–नको, सत्कार मागाहून; तुम्ही आतां कार्याला लागा आणि पहिला विरोध—

**पौंड्रक**:—कुठं करूं !

**नारद**:—लौकरच श्रीकृष्ण विजयी होऊन आल्याबद्दल त्याचा जाहीर गौरव होणार आहे.

**शिशु०**:—जाहीर गौरव ! पाहूं कसा होतो तो !

**केशी०**:—आम्ही जिवंत असतांना कृष्णाचा गौरव ! छे–छे ! ही गोष्ट आमच्या अपमानाला कारणीभूत होणारी आहे. आम्हीं ती केव्हांहि करूं देणार नाहीं.

**नारद**:—शाबास ! असाच उत्साह ठेवा. तुम्हांला योग्य तेंच फळ मिळेल. बरं राजा, येतों मी ! मात्र विरोधाचं कार्य विसरूं नको. ( जातांना ) पहावं आतां कसा काय रंग उडतो तो. नमो भगवते वासुदेवाय !

**शिशु०**:—नारदांनीं चांगली युक्ति सांगितली.

**केशी०**:—डोकं आहे बेट्याला.

**पौंड्रक**:—दोस्त हो ! तुमच्या मदतीवर या सर्व गोष्टी मी करणार आहें.

**शिशु०**:—राजा, आम्ही वाटेल ती मदत करूं.

**पौंड्रक**:—शाबास, तुमच्या आश्वासनानं मला अधिक जोम चढला आहे. त्या कृष्णाला हा कृष्ण एका दमांत उखडून टाकील.

**पद** ( राग०–बडंज ताल–एकताल )

**क्षिती नच मुळीं विजय वीरा ॥ धृ० ॥**
**रणधीर समरांगणीं ॥ जिंकीन**
**नंदकुलीन ॥ दुष्ट खष्ट पुंड प्रबल ॥**
**वाहवूनी रुधीर–धारा ॥ १ ॥**

---

## प्रवेश तिसरा

**स्थळ**–वृषभकर्णाचें घर.

**पात्रें**–विचित्रवीर्य, धेनूमती, वृषभकर्ण.

**विचित्र०**:—तत्त्व मान्य, तपशील अमान्य हें तत्त्व फारच मजेदार आहे. राजकारणांतून पळ काढून पुन्हां राजकीय मुत्सद्दी म्हणून शेखीनं मिरवायला यासारखं अजब साधनच नाहीं. वाहवा ! तत्त्व मान्य, पण तपशील अमान्य ही माझ्यासारख्या बोलक्या मुत्सद्दी पुरुषाला एक कामधेनूच सांपडली आहे. उद्यां लढाईचा प्रश्न पौंड्रक महाराजांच्या दरबारीं चर्चेला निघाला तर सेनापतीचा हुद्दा कायम ठेवायला, ही तत्त्वमान्यतेची ढाल मला फारच उपयोगी पडेल. मी उद्यांचा सेनापती जरी असलों आणि मला लढाई करावी असें मान्य असलं, तरी सेनापतीनं रणांगणावर जाऊन लढाई करावी असें तत्त्व मात्र अमान्य आहे. ज्या बेट्याच्या सुपीक मेंदूतून ही अकरा अक्षरें निघालीं असतील तो परमेश्वराचा अकरावा अवतार असला पाहिजे.

**वृषभ०**:—मी हुकमाचा ताबेदार आहें. पौंड्रक महाराजांशिवाय दुसऱ्या तिसऱ्याला कोणीहि परमेश्वर म्हणूं नये असा मला त्यांचा सक्त हुकूम आहे. सेवकानं धन्याच्या आज्ञेप्रमाणं वागावं हा सेवकाचा धर्म आहे. या धर्माप्रमाणं हा हुकमाचा ताबेदार तुम्हांला मघांचे शब्द उच्चारण्याची बंदी करतो आहें.

**विचित्र०**:—तत्त्व मान्य, तपशील अमान्य.

**वृषभ०**:—म्हणजे !

**विचित्र०**:—परमेश्वर म्हणावं हें तत्त्व मान्य आहे, पण कोणाला म्हणावं याच्या तपशिलांत तुमचा व माझा मतभेद आहे.

**वृषभ०**:—छे ! छे ! यांत मतभेद असतांच कामा नये. आम्हा हुकमाच्या ताबेदारांना मत आणि भेद यांची पर्वाच नसते. शिवाय, तुमच्या व माझ्यांत मतभेद असतां कामा नये. तुम्ही व मी पौंड्रक महाराजांचे–भगवान् वासुदेवाचे–एकनिष्ठ नोकर ही गोष्ट बाजूला ठेवली तरी तुमचा व माझा संबंध दोन बाजूंचा. एक नोकर व दुसरा माझे भावी जामात.

**विचित्र०**:—तत्त्व मान्य, पण तपशील अमान्य.

**वृषभ०**:—म्हणजे काय ?

**विचित्र०**:—मी आपला जांवई आहें, तुमच्या मुलीचा नवरा आहें हें तत्त्व मान्य, पण भावी जांवई हा तपशील मात्र अमान्य.

**वृषभ०**:—काय विचित्र माणूस आहे हो हा ! याला मी जांवई करणार असं सांगितलं आणि ताबडतोब जांवईपणाचा हक्क गाजवूं लागला. तुम्हांला वेड का लागलं आहे ?

**विचित्र**:—मुळींच नाहीं, आम्हां तत्त्वनिष्ठ सांप्रदायिकांचा उद्देश तुमच्यासारख्यांना कळणार नाहीं.

**वृषभ**:—मी हुकमाचा ताबेदार आहें; मला तो कळलाच पाहिजे.

**विचित्र**:—जांवई व्हावं हें तत्त्व मान्य आहे, पण लग्न करून जांवई व्हावं हा तपशील मात्र अमान्य आहे.

**वृषभ०**:—लग्नाशिवाय कुणी कुणाचा जांवई होतो कां ?

**विचित्र०**:—होत नसला तरी या पुढं कां होऊं नये ? मागें ज्या गोष्टी झाल्या नसतील त्या पुढें करूं नयेत असं तुमचं म्हणणं मला नापसंत आहे.

**धेनुमती**:—( प्र. क. ) माझंदेखील तुमच्याप्रमाणें मत आहे.

**विचित्र०**:—तत्त्व मान्य, तपशील अमान्य. शाबास ! लग्नाच्या पूर्वीच तुझ्या माझ्या मतांची मिळवणी झाली. संसाराला याच एकीची जरूरी आहे.

**वृषभ०**:—काय म्हणतेस धेनू ! या विचित्रवीर्याप्रमाणेंच तुझंहि मत आहे ?

**धेनुमती**:—होय बाबा !

**वृषभ**:—म्हणजे काय ! पोरी—

**धेनुमती**:—बाबा ! असे रागाऊं नका गडे. तुम्हीं रागावलांत म्हणजे मीच काय पण हेदेखील घाबरून जातात.

**वृषभ**:—मी हुकमाचा ताबेदार आहें. सेवकाचा राग असा करडाच असला पाहिजे.

**विचित्र०**:—तत्त्व मान्य, तपशील अमान्य.

**धेनुमती**:—बाबा, तुम्हांला माझं म्हणणंच समजलं नाहीं.

**वृषभ०**:—माझ्यापेक्षां तूं अधिक समजुतदार आहेस ! पोरी, मी हुकमाचा ताबेदार आहें.

**धेनुमती**:—तें मला माहीत का नाहीं बाबा !

**विचित्र०**:—कित्येक पोरींना आपल्या बापाची माहिती नसते.

**वृषभ०**:—विचित्रवर्य, मूर्खासारखे मध्येंच कांहींतरी बोलूं नका.

**विचित्र०**:—मी मूर्ख आहें हें तत्त्व मान्य, पण कांहींतरी बोलतों हा तपशील अमान्य.

**धेनु०**:—तुम्ही नका हो मध्यें बोलूं.

**विचित्र०**:—तत्त्व मान्य ! बायकोचा शब्द कसा बरं खालीं पडूं द्यावा ?

**वृषभ०**:—लग्नापूर्वींच बायकोला फार भितां हो !

**विचित्र०**:—बायकोला भ्यावं हें तत्त्व मान्य पण लग्नानंतरचा तपशील अमान्य.

**धेनु०**:—ऐकलंत का बाबा ! मी असं म्हणत होतें कीं, ज्या गोष्टी मागें झाल्या नाहींत त्या पुढें करायला कांहींच हरकत नाहीं.

**वृषभ०**:—मी हुकमाचा ताबेदार आहें. मला यांतलं कांहींएक समजलं नाहीं.

**धेनु०**:—नाहीं ना समजलं !

**वृषभ०**:—मुळींच नाहीं.

**धेनु०**:—मग मी सांगतें; पूर्वी बाप देईल तिथं मुलीला नांदावं लागे; मुलीच्या इच्छेला कांहींच किंमत देण्यांत येत नसे. पण आतां बाप देईल तिथं मुलीनं जाऊं नये असं माझं मत आहे. मुलीनं आपला पती आपणच निवडावा आणि खुशाल त्याच्याशीं संसार करावा, असं मला वाटतं.

**वृषभ०**:—फार बहकत चाललीस धेनू !

**विचित्र०**:—तत्त्व मान्य, तपशील अमान्य.

**वृषभ०**:—मी तुझ्याकरतां हा नवरा शोधून आणला आहे.

**धेनु०**:—शोधून आणला आहे !

**वृषभ०**:—हो हो, शोधून आणला आहे.

**धेनु०**:—म्हणजे, हे हरवले होते कीं काय कुठें !

**विचित्र०**:—शोधून आणलं आहे हें तत्त्व मान्य, पण हरवल्याचा तपशील अमान्य.

**वृषभ०**:—पहा पोरी, हे माझे भावी जामात तर पहा ! याच्या दृष्टीला दृष्टि भिडविण्याची स्त्रीचीच काय पण पुरुषाचीहि छाती नाहीं.

**धेनुमती**:—हें मात्र अगदीं खरं बोललांत बाबा !

**वृषभ०**:—मी हुकमाचा ताबेदार आहें. हुकमाचा ताबेदार नेहमींच खरं बोलतो.

**धेनुमती**:—नेहमींचं मला सांगतां येणार नाहीं; पण यांच्या बाबतींत आतां मात्र खरं बोललांत. माझ्या एका मैत्रिणीनं यांचं वर्णन केलं आहे. दाखवूं का म्हणून ?

**विचित्र०**:—दाखव दाखव, माझं वर्णन मलाच ऐकलं पाहिजे.

**धेनुमती**:—तुम्ही नका सांगूं मला. बाबा तुम्ही सांगा हो.

**वृषभ०**:—म्हण बरं बाळ, तुझं गाणं मी फार दिवसांत ऐकलं नाहीं.

**धेनुमती**:—ऐका अं बाबा.

**पद**—गजल.

**नर नसे खरोखर वानर हा ॥ बघुनी रुपातें येत शिसारी ॥**
**प्रेम भिकारी बुद्धिविहीन हा ॥ नंदी दुजा हा क्षेत्रविहारी ॥**
**चाले पशूपरी बोल विषारी ॥ मुळीं नसे उचित खर जंबूक हा ॥ १ ॥**

**विचित्र०**:—हें माझंच का वर्णन ?

**धेनुमती**:—हो बरं, हें आपलंच वर्णन !

**विचित्र०**:—तत्त्व मान्य, तपशील अमान्य.

**वृषभ०**:—पोरी ! अशानं यांना राग येईल ना ?

**धेनुमती**:—यांना रागहि समजत नाहीं आणि लोभहि कळत नाहीं, अशी तरतरीत बुद्धि आहे यांची !

**विचित्र०**:—मला बुद्धि आहे हें तत्त्व मान्य, पण तरतरीत आहे हा तपशील अमान्य.

**वृषभ०**:—पुन्हां असं भलतं गाणं म्हणूं नको. बरं, मी राणीसाहेबांकडे जातों; त्यांना निरोप कळवायचा आहे. मी हुकमाचा ताबेदार आहें.

**विचित्र०**:—अहो अहो वृषभकर्ण, मीहि आपल्याबरोबर येतों.

**वृषभ०**:—तें कां !

**विचित्र०**:—इथं मला एकट्याला भीति वाटते हो !

**धेनुमती**:—किती शूर आहांत हो ! हे म्हणे पौंड्रकपूरचे भावी सेनापती होणार ! शौर्याचा मुंठवडाच हा !

**विचित्र०**:—तत्त्व मान्य, तपशील अमान्य.

**वृषभ०**:—इथंच उभे रहा; मी आतां येतों. (जातो) (विचित्र धेनुमतीकडे पहात पहात हळूच जातो.)

**धेनुमती**:—असल्या गबाळ गणपतीची सरस्वती होण्यापेक्षां, लग्न न केलेलं काय वाईट ! मी बाई याच्याशीं तर कधीं कधीं लग्न करणार नाहीं. लगनिगांठीचा असा सोहाळा म्हणजे संसाराचा उन्हाळाच ! इश्श ! या ध्यानाशीं लगीन करणं म्हणजे माझ्या मैत्रिणींत हंसंच करून घेणं होय. मी लगीन करीन तर माझ्या मानसपूजेच्या देवाशींच !

**पद**—कवाली.

**प्रीती करी मोहिनी । नाथा नव भामिनी ॥**
**नाथा नव भामिनी । मधु रव बोलुनी ॥ धृ० ॥**
**सुखदुःख सोडुनी । हंसुनी अनुदिनी ॥**
**केली करोनी रिझवी तव साजणी ॥ १ ॥**

---

## प्रवेश चवथा

**स्थळ**:—बागेबाहेरील रस्ता.

[ पुष्पवती; अनुमती वगैरे सख्या. ]

**अनुमती**:—राणीसाहेब, अगदीं घाईनं कुठं निघालांत? श्रीमंतांना इतकी घाई ती कसली ! श्रीमंतांचं आयुष्य म्हणचे घाईचं आयुष्य नव्हे.

**पुष्पवती**:—अनुमती, अग आज घाईचाच दिवस आहे.

**अनु०**:—तो कशाचा बाई !

**पुष्प०**:—तुला माहीतच नाहीं का? अग, आज सत्कारसमारंभ आहे ना! आज त्यांचा स्वागतसमारंभ आहे.

**अनु०**:—पौंड्रक महाराजांचा का? महाराजांनीं असा अतुल पराक्रम तरी काय केला? कोणत्या वीरावर विजय मिळविला? नवा एखादा देश अंकित केला का? सांगा बाई लवकर! तसं कांहीं झालं असेल तर मलाहि त्यांच्या स्वागताची तयारी केलीच पाहिजे.

**पुष्प०**:—अशी रेंगाळत काय चालली आहेस? सर्वांच्या अगोदर मला त्यांचं दर्शन घ्यायचं आहे. सर्वांच्या अगोदर मला त्यांना डोळे भरून पहावयाचं आहे. मी त्यांना द्वारकेला पाहिलं तेव्हां माझ्या दृष्टीचं पूर्ण समाधान झालंच नाहीं. त्यांची ती मोहक मूर्ति प्रथम माझ्या दृष्टीला पडली तेव्हां बाई माझ्या नेत्रांचं पारणंच फिटलं! अनु, तूं जर त्यांना पाहशील तर तुझ्या दृष्टीचं नी अंतःकरणाचं खात्रीनं समाधान होईल.

**अनु०**:—राणीसाहेब, ते कोण? आणि त्यांचं म्हणजे कुणाचं दर्शन?

**पुष्प०**:—अग ते! त्यांना तूं नाहीं का ओळखलंस! सर्व जग त्यांना ओळखतं नि तूंच त्यांना ओळखत नाहींस! किती अभागी तूं अनु! त्यांचं दर्शन अभाग्यांनां भाग्यवान् करतं आणि गरिबांनां श्रीमंत करतं; त्यांचं दर्शन निराशेनं व्यापलेल्यांना आशेचा अंकुर उत्पन्न करतं; त्यांचा मंजुळ शब्द त्रस्त झालेल्या अंतःकरणाला समाधान देतो. त्यांची ती तेजस्वी दृष्टि प्रपंचानं पिडलेल्या संसारीजनांना संजीवन देते.

**अनु०**:—मघांपासून मी तुमच्या त्यांचं वर्णन ऐकतें आहें, पण ते कोण हें मला नाहींच सांगितलंत तुम्ही! सांगितल्याशिवाय मी तरी ते कोण हें कसं बाई समजूं!

**पुष्प०**:—अग तेच ग ते! ज्यांनीं माझ्या अंतःकरणांत भक्तीचा अंकुर उत्पन्न केला, ज्यांनीं माझ्या अंतःकरणांत भावनांची सरिता वाहवली, तेच ते!

**अनु०**:—राणीसाहेब, आपल्याला त्यांचं इतकं कां वेड लागलं आहे?

**पुष्प०**:—त्यांना पाहिलं कीं कोणीहि वेडंच होईल. पण सखे, रात्रंदिवस त्यांचं ध्यान करून त्यांच्या सेवेंत जीवित घालविण्याचं भाग्य माझ्या नशिबांत आहे कुठं! त्यांची मंजुळ वाणी माझ्या कानावर पडावी नि त्या मंजुळतेंत मी

गुंगून जावं असं मला वाटतं. त्यांच्याकडे घटकान् घटका अस्सं पहातच उभं रहावं असं मला वाटतं. त्यांच्यावरून दृष्टी ढळली कीं माझ्या अंतःकरणांत विरहभावनांचं नृत्य एकसारखं चालू असतं.

**अनु०**:—असा भाग्यवान् पुण्यपुरुष, पवित्र पुरुषोत्तम आहे तरी कोण !

**पुष्प०**:—सांगूंच का गडे–ऐक हं—

**पद** ( राग काफी होरी–ताल–दीपचंदी. )

**कृष्ण कन्हया तो ॥ सांवळा मनमोहन गोपाललाल मम ॥ धृ० ॥**
**मुरली धरूनी करी गीत मधु गाई शांतवी श्रीहरी स्वांत क्लान्त मम॥१॥**

**अनु०**:—आतां समजलं, आपण कृष्णाच्या दर्शनाकरतां उत्सुक झालां आहांत.

**पुष्प०**:—हें ग काय अनु !

**अनु०**:—काय झालं राणीसाहेब.

**पुष्प०**:—त्यांना कृष्णच कां म्हणालीस !

**अनु०**:—मग काय म्हणायचं राणीसाहेब ?

**पुष्प०**:—त्यांना कृष्ण नाहीं हो म्हणायचं. त्यांना कोणी नुसतं कृष्ण म्हटलं तर मला बाई त्याचा राग येतो. समजलीस का, मला त्याचा राग येतो. त्यांना किनई कृष्ण असं म्हणायचं नाहीं, त्यांना नेहमीं श्रीकृष्ण अशा नांवानं हांक मारायची बरं. श्रीकृष्ण असंच त्यांना म्हणायचं, समजलीस ना !

**अनु०**:—होय राणीसाहेब, मी त्यांना श्रीकृष्ण असंच म्हणेन !

**पुष्प०**:—अहाहा, कित्ती कित्ती गोड नांव हें ! या नांवाची कुठल्याच नांवाला सर येणार नाहीं. या नांवाचं वर्णन करायला हजारों कवींची प्रतिभा-देखील उणीच पडेल.

**पद** ( राग–मांड ताल–धुमाळी )

**श्रीकृष्ण कृष्ण कृष्ण गुणगाया ॥**
**पडली उणी कविप्रतिभा ॥ धृ० ॥**
**शेषहि थकला विधी बहु श्रमला ॥**
**घेई विसांवा श्रुति प्रतिभामा ॥ १ ॥**

म्हणून म्हणतें चल गडे लौकर.

**अनु०:**—चलावं राणीसाहेब.

**वृषभ०:**—( प्र. क. ) मी हुकमाचा ताबेदार आहें. राणीसाहेब, आपल्याला कृष्णदर्शनाला जातां येणार नाहीं.

**पुष्प०:**—तें कां !

**वृषभ०:**—मी हुकमाचा ताबेदार आहें, महाराजांनीं जसा हुकूम केला तसा मी आपल्याला कळवला !

**अनु०:**—महाराजांचा काय हुकूम आहे ?

**वृषभ०:**—कोणत्याहि माणसानं कृष्णदर्शनाला जायचं नाहीं अगर त्याच्या स्वागतसमारंभांत भागहि घ्यायचा नाहीं, असा महाराजांचा हुकूम आहे. मी हुकमाचा ताबेदार आहें; तेव्हां या हुकमानं आपणास बंदी करण्याचें कठोर कर्तव्य मला बजावलं पाहिजे.

**अनु०:**—राणीसाहेबांवर हुकूम ! वृषभकर्ण, तुम्हांला माणसंदेखील दिसत नाहींत ना !

**वृषभ०:**—माणसं पाहण्याचं काम माझं नाहीं, फक्त हुकूम बजावण्याचं काम आम्हां हुकमाच्या ताबेदार लोकांचं असतं. राणीसाहेबांच्यावरच काय पण प्रत्यक्ष महाराजांवरहि मी हुकमाची बजावणी करीन.

**पुष्प०:**—वृषभकर्ण !

**वृषभ०:**—हं–हं, राणीसाहेब !

**अनु०:**—हं–हं, राणीसाहेब.

**वृषभ०:**—मी हुकमाचा ताबेदार आहें.

**पुष्प०:**—तुमचा हुकूम मला समजला. तिकडे कळवा कीं आपली आज्ञा समजली.

**वृषभ०:**—तिकडे कळवतों कीं इकडे आज्ञा समजली. ( जातांना परत फिरून ) पण राणीसाहेब, आपण कृष्णदर्शनाला जाणार कीं काय हें नाहीं मला समजलं. हें समजल्याशिवाय मला येथून कसं बरं फिरतां येईल ?

**अनु०:**—आल्या पावलांनींच फिरतां येईल बरं.

**पुष्प०**:—त्याच्याशीं तुम्हांला काय करायचं आहे ? मी सांगतें ना तुम्हांला ! जास्त पंचाईत करूं नका.

**अनु०**:—चांगली फजिती झाली. नोकर तो नोकर नी धन्यापरीस शिरजोर. अहो हुकमाचे ताबेदार ! जा बरं खुशाल.

**वृषभ०**:—मी हुकमाचा ताबेदार आहें. जाण्याचा हुकूम झाला कीं मला गेलंच पाहिजे. ( जातो )

**अनु०**:—राणीसाहेब ! महाराजांचा हुकूम अगदींच विचित्र आहे. आतां आपल्याला दर्शनाला कसं जातां येईल बाई !

**पुष्प०**:—कां नाहीं जातां येणार ! भगवंताच्या दर्शनाला जायला इतकी ती बंदी कां म्हणून ! मी त्यांचं दर्शन घेतल्याशिवाय मुळींच राहणार नाहीं. देवाचं दर्शन घेणं म्हणजे कांहीं पाप करणं नव्हे. तें कांहीं नाहीं, मी अशीच जाणार. तुला नसलं यायचं तर नको येऊं बापडी. मी जाणारच. ( धेनुमती येते. ) कायग ! स्वागतसमारंभाची तयारी केलीस ना ?

**धेनु०**:—होय राणीसाहेब, अगदीं सर्व तयारी केली हें कळवायलाच आलें होतं मी.

**पुष्प०**:—चला तर मग लवकर.

**नारद**:—( प्रवेश करतो. ) नमो भगवते वासुदेवाय !

**अनु०**:—हा कोण आणखी दुसरा !

**पुष्प०**:—मुनिवर्य अभिवादन करतें आहें.

**नारद**:—आयुष्यमान भव.

**धेनु व अनु०**:—मुनिवर्यांना आम्हीहि अभिवादन करतों.

**नारद**:—सौभाग्यलक्ष्मी भव ! पुष्पवती, अजून तुम्ही इथंच ! तिकडे श्रीकृष्णाची स्वारी अगदीं सीमान्तस्थलीं आली तरी अजून इथंच—श्रीकृष्ण-दर्शनाचा सोहाळा नाहीं का तुम्हांला पहावयाचा ?

**अनु०**:—कृष्णदर्शनालाच राणीसाहेब निघाल्या होत्या पण——

**नारद**:—हा पण कोणता आडवा आला ?

**अनु०**:—महाराजांनीं कृष्णदर्शनाची सर्वांनांच बंदी केली आहे.

**नारदः**—कुणी ? पौंड्रकमहाराजांनीं ?

**अनु०ः**—होय, त्यांनींच.

**नारदः**—पौंड्रकाचं आणि कृष्णाचं कांहीं वांकडं आहे कीं काय !

**पुष्प०ः**—तें कांहीं मला माहीत नाहीं. मुनिवर्य, तुम्हांला आहे का कांहीं माहिती ?

**नारदः**—छे बुवा ! मला यांतलं कांहींएक माहीत नाहीं.

**धेनु०ः**—अगदीं खरंच माहीत नाहीं ?

**नारदः**—नमो भगवते वासुदेवाय !

**पुष्प०ः**—धेनुमति, सज्जनांचा शब्द नेहमीं खराच असतो. बरं मुनिवर्य, येतों आम्हीं.

**नारदः**—श्रीकृष्णदर्शनालाच निघालांत ना ! मलाहि तिकडेच यायचं आहे. ( पुष्पवती, अनुमती व धेनुमती जातात. ) पौंड्रकांनीं कृष्णदर्शन बंदीचा हुकूम काढून लढ्याला सुरवात तर फारच चांगली केली आहे. आतां याच्या पुढेंच कृष्णकलहाला खरा रंग भरणार.

**पद** ( कवाली )

**रंग भरे नमनाला नृप सजला प्रभू नटला**
**कलह भरासी आला ॥ धृ० ॥**
**कृष्णकलह नव चढत भराला ॥ दानव श्रीहरी झाला ॥**
**खल गमला प्रभुलीला अगम्य ती सकलाला ॥ १ ॥**

---

## प्रवेश पांचवा

[ कुरुष देशाची सरहद्द, स्त्री व पुरुष श्रीकृष्णाच्या स्वागतसमारंभाकरतां उभे आहेत. कृष्ण, सात्यकी, पुष्पवती, अनुमती, धेनुमती व इतर स्त्रिया पंचारती घेऊन उभ्या आहे. ]

**पुष्प०ः**—अजून कशी नाहीं त्यांची स्वारी आली ? द्वारकेला जातांना आपल्या सरहद्दीवरून ते जाणार आहेत असं मला समजलं नि म्हणून मी त्यांच्या स्वागताची तयारी केली; पण इतका विलंब तो कसा लागला ?

**अनु०**:—राणीसाहेब, तुम्ही त्यांच्या दर्शनाला इतक्या उत्सुक झालां आहांत कीं, एकएक क्षण तुम्हांला युगासारखा वाटतो.

**पुष्प०**:—अग, उत्कंठा अशीच असते.

**धेनुमती**:—एखाद्या आवडत्या व्यक्तीच्या दर्शनसुखाचं असंच तत्त्व आहे.

**पुष्प०**:—बरोबर बोललीस गडे तूं! दर्शनाची वाढती उत्सुकता तुझ्या म्हणण्याप्रमाणेंच असते.

[ आंतून सनया वगैरे वाजतात. ]

अगबाई, आलीच वाटतं स्वारी. अनु, चल चल लौकर.

**धेनुमती**:—राणीसाहेब, ती पहा स्वारीच इकडे आली.

**पुष्प०**:—अहाहा ! माझ्या दृष्टीचं नि अंतःकरणाचं एकदम समाधान झालं.

पद. ( राग–यमन कल्याण. ताल–त्रिताल )

**रिझालें बघुनिया ॥**
**यदुवर, मोहन नरवर ही सखी रमली ॥ ध्रु० ॥**
**हृदय खुलें मोहीत मन झालें ॥**
**पुनीत झाली तनुही अनुप्रीया ॥ १ ॥**

[ श्रीकृष्ण सात्यकीसह येतो. ]

**श्रीकृष्ण**:—सात्यकी, हा काय प्रकार आहे ? हे स्त्रीपुरुष कशाकरतां जमले आहेत ?

**सात्यकी**:—महाराजांच्या सत्काराकरतां.

**श्रीकृष्ण**:—माझा सत्कार !

**अनु०**:—होय महाराज ! आपण स्वारीवरून विजयी होऊन आलांत म्हणून आम्ही कुरुषचे प्रजाजन आपलं स्वागत करीत आहोंत.

**धेनुमती**:—या आमच्या राणीसाहेब आहेत.

**श्रीकृष्ण**:—पौंड्रकपत्नी कां ?

**अनु०**:—होय महाराज.

**सात्यकी**:—महाराजांनीं या समारंभाला आपल्या भक्तांना अनुज्ञा द्यावी.

**श्रीकृष्णः**—सात्यकी, भक्तांनीं शुद्ध अंतःकरणांनीं केलेल्या सेवेचा मी कसा बरं स्वीकार करणार नाहीं ? या अखिल विश्वांत मला माझे भक्त जितके प्रिय आहेत तितके दुसरे कोणीहि नाहीं.

**पद** (राग–पटदीप ताल–त्रिताल)

**नाहीं लोकीं कोणी ॥ मजशी दुजे जाणी ॥ धृ० ॥**
**प्रिय भक्तवाणी या सुहृदास सुखी गणी ॥ १ ॥**

**पुष्प०ः**—हे विचार ऐकल्यानं यांच्याविषयींची माझी भक्ति अधिक अधिकच वाढूं लागते. खरोखरच आज माझ्या अंतःकरणाचं समाधान झालं. अनु, चल आटप. या मंगलमूर्तीचं आपण स्वागत करूं.

**अनु०ः**—राणीसाहेब, आम्हीं तयार आहोंत.

**पद**

**आम्ही करूं कृष्ण गुणगान स्मरुनी भगवान ॥**
**पदीं करूं शुद्ध प्रणिपात त्यजुनी अभिमान ॥ धृ० ॥**
**सुमनासी अर्पूनी पूजा प्रभूची ॥**
**मानुनी घ्यावी सुजाण ॥ १ ॥**

**पौंड्रकः**—(कृष्णवेषांत) थांबवा ! याचं पूजन थांबवा !

**शिशु०ः**—(प्र. क.) याचं पूजन कसलं करतां ! हा पूजनाला अगदीं अयोग्य आहे.

**केशीराजः**—(प्र. क.) याचं पूजन करणं म्हणजे आमच्या शत्रूचं पूजन करणं आहे.

**पुष्प०ः**—आम्ही हें भगवंताचं पूजन करतों आहोंत !

**पौंड्रकः**—हा भगवंत ! याला कोण म्हणतो भगवंत ! असल्या क्षुद्र माणसाला भगवंत म्हणणं म्हणजे खऱ्या भगवंताची विटंबना करणं होय !

**शिशु०ः**—याचं अभिनंदन करणं म्हणजे एका खुनी माणसाचा गौरव होय.

**केशी०ः**—याचा सत्कार करणं म्हणजे अपराध्याचं अभिनंदन होय.

**सात्यकीः**—अहो घमेंडखोर राजे ! माझ्या महाराजांविरुद्ध अशुभ वाणीनं बोलाल तर त्याचं उत्तर हें खड्ग बरोबर देईल.

**केशी०**:—खड्गाची भीति आमच्यासारख्या बलिष्ठांना कसली !

**शिशु०**:—आम्ही पुन्हां म्हणतों कीं, हा तुमचा महाराज अपराधी आहे; खुनी आहे.

**पौंड्रकः**—यानं आपल्या मामाचा—आमच्या मित्राचा म्हणजेच कंसाचा अन्यायानं खून केला. जरासंधाचा त्याच कुटिलतेनं वध करविला. याचं अभिनंदन करणं म्हणजे खुनी माणसाला प्रोत्साहन देणं आहे.

**शिशु०**:—याचा सत्कार करणं म्हणजे अनीतीचा जयजयकार करणं होय.

**केशी०**:—याचा सन्मान करणं म्हणजे गुन्हेगाराचा गौरव करणं होय.

**पौंड्रकः**—राणीसाहेब !

**पुष्प०**:—महाराज! यांच्याविषयीं आपणा सर्वांचा कांहींतरी गैरसमज झालेला आहे. आपण म्हणतां त्याप्रमाणं यांची तशी मुळींच वागणूक नाहीं. महाराज ! एखाद्या सज्जनाला असं बोलणं म्हणजे सज्जनाची हेटाळणीच नव्हे का ? वेळ पडली तर शत्रूचंहि अभिनंदन आपण करतोंच ना ? या पुरुषोत्तमाचं अभिनंदन म्हणजे अपराध्याचं अभिनंदन नसून सर्व जगाच्या उद्धारार्थ अवतरलेल्या अवतारी पुरुषाचं अभिनंदन होय महाराज !

**पौंड्रकः**—राणीसाहेब ! आम्हांला आपल्यापेक्षां अधिक ज्ञान आहे. आपल्याला हा अवतार वाटतो, पण याला अवतारी म्हणायला, पुरुषोत्तम म्हणायला आम्ही बिलकूल तयार नाहीं.

**शिशु०**:—हा मुळीं खरा कृष्णच नव्हे !

**केशी०**:—हा भगवान् वसुदेवच नव्हे !

**पुष्प०**:—मग खरा श्रीकृष्ण कोण ?

**केशी०**:—हा—हा पौंड्रक ! कुरुष देशाचा सम्राट.

**सात्यकीः**—काय म्हणतां ! हा तुमचा मूर्ख राजा श्रीकृष्ण !

**केशी०**:—होय, हाच राजा श्रीकृष्ण ! तुमचा राजा खरा कृष्णच नव्हे. एखाद्याचा अनीतीनं खून करून त्यावर विजय मिळविल्यानं कोणीहि पुरुषोत्तम ठरत नाहीं.

**श्रीकृष्णः**—केशीराज ! मी मघांपासून तुमच्या दर्पोक्ति ऐकतों आहें. तुम्ही

मला कसल्याहि विषारी वाणीनं संबोधा अगर वाटेल ते आरोप करा, मला त्याची मुळींच दिक्कत वाटत नाहीं. कंसाला ठार मारलं व जरासंधाचा वध करविला यांत तुम्हांला माझा अपराध दिसला, परंतु मी केलं तेंच योग्य केलं.

**पौंड्रकः**—काय योग्य केलं ?

**श्रीकृष्णः**—हो, योग्यच केलं ! दुष्टांचं निर्दालन आणि सुष्टांचं प्रतिपालन हें प्रत्येक क्षत्रियाचं कर्तव्य आहे. कोणतीहि व्यक्ति विश्वाला जाचक झाली कीं त्या व्यक्तीला निर्वाणपदाला पोंचवून विश्वशांति केलीच पाहिजे. माझ्या मामाला –उन्मत्त कंसाला निर्वाणपदाला पोंचविण्यांत माझ्या हातून अनीति झाली असं कोणताहि सज्जन म्हणणार नाहीं. उन्मत्त सत्तेला योग्य आळा घालून प्रजेला सुखी करणं हें माझं ब्रीद आहे. आसुरी संपत्तीचा नायनाट करून दैवी संपत्तीचा उत्कर्ष करणं हा माझा बाणा आहे. दैत्यवृत्तीपासून मानवी शक्तीचं संरक्षण करणं हें माझं जीवितकार्य आहे. पशुवृत्तीच्या पुरुषापासून मानवी स्त्रीशक्तीचं संरक्षण करणं ही माझी बिरुदावली आहे. या माझ्या सांप्रदायाच्या आड येणारी कोणतीहि व्यक्ति असो, प्रत्यक्ष भाऊ असो अगर नात्यागोत्यांतील स्त्रीपुरुष असोत त्याला योग्य तेंच बक्षीस द्यायला मी मागेंपुढें पाहाणार नाहीं.

**केशी०ः**—नरकासुराला ठार मारण्यांत हीच नीति होती काय ?

**श्रीकृष्णः**—यांत काय शंका ! माझ्या कोणत्याहि कृत्याची पार्श्वभूमि नैतिक, शुद्ध आणि परम पवित्र अशीच असते.

**पौंड्रकः**—परम पवित्र–वाः ! छान आहेत तुझ्या कल्पना अधमा !

**सात्यकीः**—महाराजांचा पवित्र उद्देश तुमच्यासारख्या विरोधकांना मुळींच कळणार नाहीं.

**नारदः**—( प्र. क. ) नमो भगवते वासुदेवाय ! अरे ! हा काय प्रकार ! हे दोन श्रीकृष्ण कुठले ! इतके दिवस या जगांत एकच कृष्ण होता, पण आतां एकाला दुसरा असा प्रकार झाला. पण यांतला खरा कृष्ण कोणता !

**पौंड्रकः**—मुनिवर्य, तुम्हांला अजून या कृष्णाबद्दल खात्री पटत नाहीं ! मीच खरा श्रीकृष्ण आहें हें कसें विसरतां !

**नारदः**—तूं श्रीकृष्ण !

**शिशु०ः**—हो ! हाच खरा श्रीकृष्ण.

**नारद**:—वाहवा ! काय मौज आहे पहा !

**पौंड्रक**:—राणीसाहेब, तुम्हांला कृष्णपूजन करायचं आहेना !

**पुष्प०**:—होय महाराज.

**पौंड्रक**:—मग या तोतया श्रीकृष्णाचं न करतां माझं—या खऱ्या श्रीकृष्णाचं करा !

**पुष्प०**:—हें काय म्हणतां महाराज !

**पौंड्रक**:—योग्य तेंच म्हणतों. करा, माझं पूजन करा !

**पुष्प०**:—तें खरं श्रीकृष्णपूजन होणार नाहीं.

**पौंड्रक**:—कां होणार नाहीं ?

**पुष्प०**:—सर्व जग या दिव्य देवतेला श्रीकृष्ण म्हणतं ना !

**पौंड्रक**:—जग मूर्ख आहे. मीच खरा कृष्ण आहें, पुरुषोत्तम आहें. करा माझं पूजन करा. कां ! स्तब्ध कां ? माझं पूजन प्रत्येकानं केलं पाहिजे. राणीसाहेब आमची अवज्ञा करून आमच्या रागाला बळी पडूं नका !

**पुष्प०**:—महाराज, असं भलतंच काय बोलतां ! या दासीनं आपली अवज्ञा कधीं तरी केली आहे कां ? पतिव्रतांना पति जरी परमेश्वर असला तरी परमेश्वराचा परमेश्वर शुद्ध भावानं पूजायला काय हरकत आहे ?

**पौंड्रक**:—तुमचं तत्त्वज्ञान नको, माझीच आज्ञा पाळली पाहिजे. यापुढें जो कोणी या कृष्णाचं पूजन करील, याचं कीर्तन करील अगर याची स्तुति करील तो आमचा शत्रु होय. करा, माझं पूजन करा !

**पुष्प०**:—मोठाच प्रश्न पडला आहे ! पुरुषोत्तमा, या पेंचांतून तुझ्या चरण-दासीला तूंच सोडव.

**श्रीकृष्ण**:—पुष्पवती, मला तुझं पूजन पोंचलं. तुझी मानसपूजा मला पावली. माझं अभिनंदन झालं इतकं पुरे—

**नारद**:—देवा ! असं कसं बरं !

**श्रीकृष्ण**:—नारदा, कोणत्याहि व्यक्तीनं माझं मनांतल्या मनांत अभिनंदन केलं तरी तें मला पोंचतंच. भक्तीचं फाजील अवडंबर माजविण्यापेक्षां शुद्ध मानसिक पूजा मला अधिक पसंत आहे.

**नारदः**—नमो भगवते वासुदेवाय !

**पौंड्रकः**—चला राणीसाहेब चला लवकर. या माझ्या शत्रूदेखत माझं अभिनंदन झालं पाहिजे. करतां किंवा नाहीं ? ( पुष्पवतीला ओढतो ) चला करा माझं अभिनंदन !

[ आकाशांतून श्रीकृष्णावर सारखी पुष्पवृष्टि होते. ]

**सात्यकीः**—पहा ! उन्नत राजा, पहा !

**पौंड्रकः**—अरेरे ! हें काय पाहतों मी !

**नारदः**—खरं कृष्ण-पूजन कोणतं ? हें कीं हें ? नमो भगवते वासुदेवाय !

[ श्रीकृष्णावर सारखी पुष्पवृष्टि, नारद, पुष्पवती, सख्या कृष्णाला नमस्कार करतात. पौंड्रक, शिशुपाल, केशीराज संतापतात. नारद हंसतात. ]

**अंक पहिला पूर्ण.**

---

# अंक दुसरा



## प्रवेश पहिला

**स्थळः**—वृषभकर्णाच्या घराबाहेरील रस्ता.

**पात्रेंः**—विचित्रवीर्य, वृषभकर्ण, धेनुमती.

**विचित्रवीर्यः**—सकाळपासून या घटकेपर्यंत महाराजांच्या नव्या आज्ञापत्रिकेचें पारायण करतों आहें, पण यांतल्या एका अक्षराचा अर्थ समजला असेल तर शपथ; राजे लोकांना ही एक वाईट संवय लागली आहे. आज्ञापत्रिका कसल्या काढतात कुणाला ठाऊक ! यांत मला तर कांहींच अर्थ दिसत नाहीं. ज्यांत अर्थ मिळत नाहीं तें निरर्थक असं माझं तत्त्व आहे. या पत्रिकेंतलं तत्त्व घटकाभर मान्य केलं तरी हिच्यांतला तपशील अमान्य आहे. या पत्रिकेंतील अक्षर तरी किती लहान आहे बुवा ! माझ्यासारख्या मोठ्या माणसांनीं हीं लहान अक्षरं कशीं वाचायचीं ? डोळे मोठे करून पाहतों तरी बेटीं हीं अक्षरं लहानच दिसतात. मला ही आज्ञा समजणार कशी आणि हिची बजावणी मी करणार कसा ! माझ्या भावी बायकोला विचारून पाहिलं पाहिजे. पण ती घरांत असेल तर बरं ! जर कां बाहेर गेली असेल तर मला बाहेरच थांबावं लागेल.

**धेनुमतीः**—बाबा म्हणतात त्यांच्याशीं लगीन कर.

**विचित्र०ः**—काय ऐकतों मी ! त्यांच्याशीं लगीन कर. म्हणजे मला सोडून ही दुसऱ्या कोणाशीं लग्न करणार कीं काय ! तत्त्व मान्य, तपशील अमान्य.

**धेनु०ः**—त्यांच्याशीं लगीन करण्यापेक्षां आजन्म अविवाहितच राहिलेलं काय वाईट !

**विचित्र०ः**—तत्त्व मान्य, अविवाहित राहण्याचं तत्त्व मान्य, पण संसाराचा तपशील अमान्य.

**धेनु०ः**—बाबा आले कीं त्यांना स्पष्ट सांगेन कीं, मला मुळीं त्यांच्याशीं लगीनच करायचं नाहीं.

**विचित्र०ः**—त्यांच्याशीं तूं मुळींच लग्न करूं नको. लग्न न करण्याचं तत्त्व मला मान्य आहे; पण त्यांच्याशीं लग्न लावण्याचा तुझा तपशील अमान्य आहे.

**धेनु०**:—आली मेली ब्याद पुन्हां इथं !

**विचित्र०**:—अग असला विचार कसला करतेस ! विचारानं डोकं फिरून जातं ना !

**धेनु०**:—मला तर तुमचं डोकं फिरल्यासारखं दिसतं आहे.

**विचित्र०**:—मला डोकं आहे हें तत्त्व मान्य, पण फिरल्याचा तपशील अमान्य. मी उभ्या जन्मांत विचारहि केला नाहीं किंवा अविचारहि केला नाहीं. तेव्हां डोकं फिरण्याची या जन्मीं तरी मला भीति नाहीं.

**धेनु०**:—पण मला याच जन्मीं भीति आहे.

**विचित्र०**:—ती कुणाची ?

**धेनु०**:—तुमची.

**विचित्र०**:—माझी !

**धेनु०**:—हो हो तुमची.

**विचित्र०**:—ती कशी बुवा ?

**धेनु०**:—तुमच्या लग्नाची !

**विचित्र०**:—तत्त्व मान्य, लग्नाची भीति असते हें तत्त्व मान्य, पण माझ्या भीतीचा तपशील अमान्य !

**धेनु०**:—तुमचं लग्न होईपर्यंत मला भीतीच आहे.

**विचित्र०**:—माझं लग्न होईपर्यंत तुला भीति आहे हें तत्त्व मान्य ! मग विलंब कां ! आतांच उरकून टाकूं म्हणजे तुझी भीति जाईल आणि माझी काळजी दूर होईल. चल आटप ! म्हणूं का मंगलाष्टक ? उगीच उशीर नको. लग्नाला अगोदर आणि संसाराला मागाहून असं माझं तत्त्व आहे.

**धेनु०**:—मी तुमच्याशीं लगीन करूं म्हणतां ?

**विचित्र०**:—होय ग ! माझ्याशींच लग्न कर.

**धेनु०**:—उं हूं ! मी नाहीं ग बाई !

**विचित्र०**:—तूं नाहींना माझ्याशीं लग्न करीत ?

**धेनु०**:—नाहीं !

**विचित्र०:**—नको करूं ! मीच तुझ्याशीं लग्न लावतों म्हणजे झालें ! तूं नाहींतर मी !

**धेनु०:**—किती मूर्ख आहांत हो तुम्हीं.

**विचित्र०:**—तत्त्व मान्य ! मी मूर्ख आहें हें तत्त्व मान्य, पण प्रमाणाचा तपशील अमान्य !

**धेनु०:**—मला मुळीं तुम्ही आवडतच नाहीं.

**विचित्र०:**—पण तूं मला फार फार फारच आवडतेस !

**धेनु०:**—तुमचा नी माझा जोडा शोभिवंत दिसणार नाहीं.

**विचित्र०:**—शोभेचा संसार कधींच शोभिवंत दिसत नाहीं.

**धेनु०:**—तत्त्व मान्य, म्हणूनच मी माझ्या पतीची निवड अशी केली आहे.

**विचित्र०:**—कशी केली आहेस ?

**धेनु०:**—पहा या कागदावर.

**विचित्र०:**—आला पुन्हां वाचण्याचा प्रसंग. हो आज्ञापत्रिका वाचतां येईना तों ही आणखीं पतिपत्रिका वाचण्याची जबरदस्ती.

**धेनु०:**—पाहिलीत कां वाचून ?

**विचित्र०:**—लढवय्याला वाचण्याचं वावडं असतं. तो आपली प्रणय-पत्रिका शेजाऱ्याकडून लिहून घेतो हें तत्त्व तुला कसं माहित नाहीं ?

**धेनु०:**—तुमचं नी लेखणीचं वांकडं आहे वाटतं ?

**विचित्र०:**—तत्त्व मान्य ! लेखणीचं माझं वांकडं आहे, पण तरवारीचं नी या सेनापतीचं सख्य आहे. ही माझी अर्धांगी आहे.

**धेनु०:**—मग वादच संपला मुळीं. तुम्हाला ही अर्धांगी आहेच.

**विचित्र०:**—वीराला एक अर्धांगी असतां कामा नये !

**धेनु०:**—तुमची अक्कल फार वाहत चालली.

**विचित्र०:**—वाहणारी अक्कल फार चांगली !

**धेनु०:**—म्हणूनच तुम्ही मला नापसंत आहांत ! वाहत जाणाऱ्या अकलेचा पति मला अगदीं नापसंत आहे.

**विचित्र०:**—पण या पसंतपत्रिकेंत तरी तुला कोण मान्य आहे तें तरी ऐकूं दे !

**धेनु०:**—लक्षपूर्वक ऐका.

**विचित्र०:**—लक्ष देऊन ऐकतों.

**पद**—कवाली

**धेनु०:**—

> **पती तोच योग्य बाई शोभेल याच काला ॥ धृ० ॥**
> **पुरवील कौतुकाला चुरी जो सखीपदाला ॥**
> **रुसतां सखी गुलाबी रुसुनी बसे निराळा ॥**
> **हंसवी सखी जिवाला ॥१ ॥**

**विचित्र०:**—तत्त्व मान्य, तपशील अमान्य ! जमायचं कठीणच दिसतं आहे ! जमलं नाहीं तरी प्रयत्न सोडतां कामा नये. एकूण तुला असा पति पाहिजे. ( वृषभकर्ण येतो )

**वृषभ०:**—अरे ! तुम्ही अजून इथंच !

**विचित्र०:**—हो ! मी अजून इथंच आहें !

**वृषभ०:**—आज्ञापत्रिका देऊन किती तरी वेळ झाला, तरी अजून त्याची बजावणी केलीत नाहीं. अगदींच अजागळ आहांत.

**धेनु०:**—आणि बाबा, अशा अजागळाशीं तुम्ही मला लगीन कर म्हणतां !

**वृषभ०:**—मी हुकमाचा ताबेदार आहें. अगोदर हुकूम नंतर लग्न ! या वेळीं लग्नाच्या गोष्टी काढूं नको. चल जा पोरी.

**धेनु०:**—( जाऊन परत येते ) पण बाबा ! यांना पुन्हां इथं येण्याची बंदी करा.

**वृषभ०:**—मी ती व्यवस्था करीन, आतां तूं जा. ( जाते. )

**विचित्र०:**—आज्ञापत्रिकेंतला पहिला मुद्दा—

**वृषभ०:**—काय आहे सांगा पाहूं !

**विचित्र०:**—महाराजांनीं केव्हांच सांगितला आहे, पण मला तो अद्याप वाचायचा आहे.

**वृषभ०**:—वाचा पाहूं.

**विचित्र०**:—पहिला मुद्दा असा आहे कीं, वाटेल त्याला पकडून आणायचं.

**वृषभ०**:—महाशंख आहांत अगदीं.

**विचित्र०**:—तत्त्व मान्य, तपशील अमान्य.

**वृषभ०**:—पकडून आणायचं पण कोणता गुन्हा केला म्हणजे ?

**विचित्र०**:—पकडून आणायचं हें तत्व मान्य, गुन्ह्याचा तपशील अमान्य.

**वृषभ०**:—आतां काय कपाळ फोडूं तुमच्यापुढें ?

**विचित्र०**:—मी तुमच्या मुलीपुढं फोडलं, आतां तुम्ही माझ्यापुढं फोडा.

**वृषभ०**:—आज्ञा समजल्याशिवाय तुम्ही करणार तरी काय !

**विचित्र०**:—तुम्ही जें करणार तेंच !

**वृषभ०**:—मी काय करणार ?

**विचित्र०**:—तें तुम्हांला माहीत.

**वृषभ०**:—ऐका ! जो कोणी कृष्णाचं नांव घेईल, त्याची स्तुति करील, पूजन करील तो गुन्हेगार समजायचा. त्याला एकदम पकडायचं आणि महाराजांसमोर उभं करायचं ! काय समजलांत ? तसेंच, आपल्या महाराजांना श्रीकृष्ण असं म्हणायला सर्वांना साम दाम भेद दंडांनीं भाग पाडायचं. काय समजलांत !

**विचित्र०**:—तुम्ही सांगितलंत् तें सर्व समजलों. पण काय हो, इतक्या क्षुल्लक कामगिरीला माझ्यासारखा भावी सेनापती कशाला ? तें काम तुम्ही सहजच कराल.

**वृषभ०**:—मी हुकमाचा ताबेदार आहें. मला जास्त कांहीं माहीत नाहीं. हीं सारीं कामं तुम्ही व मी मिळून करायचीं आहेत. काय ?

**विचित्र०**:—तत्त्व मान्य !

**वृषभ०**:—चला तर माझ्याबरोबर.

**विचित्र०**:—मी पोषाख बदलून येतों.

**वृषभ०**:—असेच आलांत तर !

**विचित्र०**:—असाच यायचं तत्त्व मान्य, पण पोषाख न बदलण्याचा

तपशील अमान्य. याच पोषाखांत आलों तर मी तुमच्यापेक्षां श्रेष्ठ आहें हें कसं लोकांना समजणार !

**वृषभ०**:—मी हुकमाचा ताबेदार आहें—चला लौकर. ( जातात )

---

## प्रवेश दुसरा

**स्थळः**—पौंड्रकाचा महाल.

**पात्रें**:—[ नारद, शिशुपाल, केशीराज, वृषभकर्ण, पुष्पवती वगैरे ]

**पौंड्रकः**—एकसारखा मी विचार करतों आहें पण अजून मनाचं समाधान होत नाहीं. परवांचा प्रकार अद्भुत तर खराच. ऐनवेळीं माझ्या प्रतिष्ठेची मानहानि झाली हा माझा अपमान अगोदर भरून काढलाच पाहिजे. क्षत्रियांना अपमान कधींहि सहन होणार नाहीं. हरप्रयत्नांनीं या झालेल्या अपमानाची भरपाई भरून काढली पाहिजे. कृष्णाची वाढती घमेंड पार धुळीला मिळाली पाहिजे. कृष्णनाशाबरोबर यादवांचाहि नाश करून या श्रीकृष्णाचं वर्चस्व सर्व भरतखंडांत दुमदुमलं पाहिजे. सर्वांच्यापेक्षां हा पूर्वीचा पौंड्रक आणि आजचा पुरुषोत्तम श्रीकृष्ण जगद्वंद्य पुण्यश्लोक झाला पाहिजे.

**पद** ( राग–भटीयार, ताल त्रिताल. )

**प्रती भगवान जगतीं श्रीमान ॥ धृ० ॥**
**मिरवी सुयश लोकीं ॥ त्रिजनीं झाला धीमान ॥**
**विधी शोभे छान ॥ १ ॥**

**शिशु०**:—पुण्यश्लोक पुरुषोत्तमाचा जयजयकार असो.

**केशी०**:—पवित्र पुण्यपुरुष चिरंजीव होवो.

**पौंड्रकः** तुमच्यासारख्या मित्रांचा मी सदैव ऋणी आहें.

**शिशु०**:—परवांच्या अपमानाची फेड केल्याशिवाय या ऋणाची फेड कशी होणार !

**केशी०**:—यादवांच्या कैवाऱ्याची घमेंड जिरविल्याशिवाय आम्ही कसे स्वस्थ राहाणार !

**शिशु०**:—परवांची संधी गमावली ही फार मोठी चूक झाली.

**केशी०**:—महाराजांनीं नुसती अनुज्ञा द्यायला पाहिजे होती. म्हणजे त्या अधमाधमाचं पूजन या खड्गानं जागच्या जागींच केलं असतं.

**पौंड्रकः**—राजे लोकहो ! जें होतं तें बऱ्याकरतांच होत असतं. तुम्हीं आम्हीं मनांत आणलं असतं तर तो यादव जागच्या जागींच नाहींसा झाला असता. पण तसं करणं आपल्यासारख्या श्रेष्ठ क्षात्रियांना शोभलं नसतं. वीराला युद्धाचं जाहीर आव्हान देऊन रणांगणावर लोळवणं हेंच खरं धर्म–युद्ध होय. सर्वांच्या समक्ष, त्याच्या अनुयांयासमक्ष त्याला निर्वाणपदाला पोंचविणं हेंच श्रेयस्कर आहे.

**शिशु०**:—आम्हांला हा मार्ग पसंत आहे.

**केशी०**:—आतांच्या आतां त्याला युद्धाचं आव्हान द्या. युद्धाला सत्वर तयार हो अगर आमचं श्रेष्ठत्व कबूल कर असा निर्वाणीचा संदेश त्याला पाठवा.

**पौंड्रक०**:—असा संदेश त्याला पाठविलाच पाहिजे. केशीराज, तुमचा हा मार्ग श्रेयस्कर आहे. परंतु आपला प्रतिस्पर्धी–आपला शत्रु किती व कसा कारस्थानी आहे याचाहि आपल्याला विचार केलाच पाहिजे.

**शिशु०**:—तो कसला कारस्थानी ! आमच्या कारस्थानापुढें त्याच्या कारस्थानाचा काय पाड लागणार आहे !

**केशी०**:—त्यांनीं गोकुळांतल्या गोपीशीं कारस्थानं करावीं; आम्हांसारख्या रथीमहारथींशीं तो कसलीं कारस्थानं करणार !

**शिशु०**:—कृष्ण मोठा कारस्थानी म्हणून त्या अर्जुनानं आणि भोळ्या बुद्धीच्या धर्मराजानं त्याचीं स्तुतिस्तोत्रं गावींत; आम्हांला तो कारस्थानीहि वाटत नाहीं अथवा लढवय्याहि वाटत नाहीं.

**केशी०**:—बरोबर आहे. हा मुळीं राजाच नाहीं. मूठभर गवळ्यांवर सत्ता गाजवणाऱ्याला राजा म्हणणं म्हणजे राजा ह्या सर्वश्रेष्ठ नांवाची विटंबनाच होय.

**शिशु०**:—उठल्यासुटल्यांनीं राजा व्हावं इतकं राजेपण सवंग नाहीं. राज्य मिळणं आणि राजा होणं याला पुण्याई लागते.

**केशी०**:—भिकारी कधींतरी भगवान् झाला आहे कां ?

**पौंड्रक०**:—मग काय म्हणतां, त्याला युद्धाचं आव्हान पाठवूं ?

**केशी०**:—बेलाशक.

**शिशु०**:—आत्तांच्या आतां पाठवा.

**नारद०**:—(प्र. क.) नमो भगवते वासुदेवाय ! अरे वा ! राजा, तूं तर आज अगदीं कृष्णासारखाच दिसायला लागलास.

**पौंड्रक०**:—मी प्रत्यक्ष कृष्णाच आहें; यदुवीर आहें–भगवान् वासुदेव आहें.

**नारद**:—कबूल, मला हें अगदीं कबूल. वाहवा ! आहेस खराच कृष्णा. लोकांकडून हंसं करून घेण्यासारखा कृष्ण आहेस खरा.

पद—गजल

**हा कृष्ण केवीं सजला**
**वेषांत खूप नटला ॥ धृ० ॥**
**म्हणवी स्वतः यदुराणा ॥**
**मिरवी खरा विशाला ॥ १ ॥**
**कोठें असे सुदर्शन ॥**
**नाहीं पवित्र दर्शन ॥**
**कलहाशीं रंग भरला ॥**
**हा कृष्ण कृष्ण फसला ॥ २ ॥**

बरं पण नुसतं कृष्ण होण्यानं कृष्णाचा नायनाट कसा होणार ! प्रत्यक्ष कांहीं तरी कार्य झालंच पाहिजे.

**पौंड्रक०**:—आम्ही आतांच त्याला युद्धाचं आव्हान पाठविणार आहोंत !

**नारद**:—तें कांहीं वाईट नाहीं म्हणा; पण युद्धसंभवाला कांहींतरी कारण घडलंच पाहिजे. कारणाशिवाय कार्य कसं बरं होईल ?

**शिशु०**:—करायचं आहे काय कारण !

**केशी०**:—कार्य आणि कारण आमच्यासारखे लढवय्ये पहातच नाहींत.

**नारद**:—तें मला कबूल आहे, पण कारण झालं तर तुमची बाजू तेवढीच चांगली राहील. उद्यां तुमच्या डोक्यावर दोष येऊं नये म्हणून म्हणतों.

**पौंड्रक०**:—कारण तरी काय शोधावं ?

**नारदः**—तें मी सांगतों. कारणाला काय तोटा ! तूं खरा खरा कृष्ण तर आहेस.

**पौंड्रक०**:—यांत मुळींच शंका नाहीं.

**शिशु०**:—हा एकदांच नव्हे तर शंभरदां कृष्ण आहे.

**नारदः**—आणि तो द्वारकेचा—

**पौंड्रक०**:—खोटा आणि तोतया कृष्ण आहे.

**नारदः**—झालं तर मग ! राजा, त्या कृष्णाला अगोदर असा निरोप पाठव कीं, तूं तोतया असून माझं सुदर्शन आणि किरीटकुंडलं चोरून नेलीं आहेस, तीं माझीं मला परत पाठव. जर पाठवलीं नाहींस तर तुला तुझ्या प्राणाला मुकावं लागेल. कृष्ण कांहीं किरीटकुंडलं अथवा सुदर्शन देणार नाहीं. असं झालं म्हणजे एक कारण सांपडेल आणि युद्धाचं आव्हान द्यायला तुम्हांला बरं पडेल !

**पौंड्रकः**—वा ! ही छान युक्ति आहे.

**शिशु०**:—असं केलं तर उत्तमच होईल.

**केशी०**:—मलाहि ही गोष्ट मान्य आहे.

**नारदः**—याला मुळींच विलंब करूं नका. आतां माझ्यादेखत दूत रवाना करा.

**पौंड्रकः**—वृषभकर्ण !

**वृषभ०**:—हुकमाचा ताबेदार तयार आहे सेवेला.

**पौंड्रकः**—आतांच्या आतां द्वारकेला जा आणि त्या कृष्णाकडून सुदर्शन चक्र, शंख-पद्मादि भूषणें आणि कीरीटकुंडलं मागून आणा. या सर्व वस्तू आमच्या महाराजांच्या असून—खऱ्या भगवान् वासुदेवाच्या असून, तूं त्या चोरून नेल्या आहेस तेव्हां त्या माझ्या हवालीं कर, नाहींतर युद्धदुंदुभि वाजवावा लागेल. काय समजलांत !

**वृषभ०**:—हुकमाचा ताबेदार सर्व कांहीं समजला !

**पौंड्रकः**—जा, असेच्या असे जा—

**नारदः**—पण थांबा. राजा, याच्याबरोबर शिशुपालाला पाठीव, म्हणजे हा तुझा प्रतिनिधि चांगली कामगिरी करील. काय शिशुपाल !

**शिशु०**:—हो, मी तयार आहें. पौंड्रक महाराजांकरतां मी वाटेल तें करायला तयार आहें. चला वृषभकर्ण, माझा रथ तयार करा. असेच्या असे निघूं. ( जातात. )

**केशी०**:—राजा, मीहि पुढच्या तयारीला लागतों. ( जातो. )

**पौंड्रक०**:—ठीक आहे. मुनिवर्य, ही युक्ति फारच छान आहे. आतां पाहतों त्या कृष्णाची घमेंड !

**नारद**:—नमो भगवते वासुदेवाय ! चालला, माझ्या नाटकाला रंग भरत चालला. नमो भगवते वासुदेवाय ! ( जातो )

**पौंड्रकः**—बस्स ! आतां एका क्षणांत मी सर्वश्रेष्ठ पुण्यश्लोक होणार ! हा एवढा शत्रु नाहींसा झाला म्हणजे हा पुरुषोत्तम अखिल विश्वाचा सम्राट् होणार ! अजातशत्रु होणार ! वाहवा ! या गोड कल्पनेनं माझ्या अंतःकरणांतला आनंद द्विगुणित झाला आहे.

**पद**—( राग–सुग्रही ताल–त्रिताल. )

**आनंदा नच सीमा आतां दैन्य निमालें ॥**
**जाई चिंता पार लयाला जिंकी त्या अस्त्रबलें ॥ ध्रृ० ॥**
**भंग करोनी यदु कुलवाली शांत करोनी मन्मन**
**झालों कृष्ण विलोलें ॥ १ ॥**

**पुष्प०**:—( प्र. क. ) आज इकडे आनंद कशाचा झाला बाई ! मला नाहीं का सांगायचं–मी विचारतें आहें स्वारीला. आज गडे स्वारीची मुद्रा इतकी प्रफुल्लित ती कां झाली ! कोणत्या संदेशानं चिंतेचे ढग मावळले ! नाहीं का सांगायचं मला ! राजराजेश्वरांनीं दासीशीं अशी प्रतारणा करूं नये गडे; पत्नी ही पतीची अर्धांगी असते ना ! आपलं जें दुःख तें माझं दुःख नि जें आपलं सुख तेंच माझं सुख, म्हणून म्हणतें आज इतका का आनंद झाला आहे तो सांगावा गडे मला ! सांगायचं म्हणतें ना, बोला गडे लवकर.

**पद**

**आजि गडे बोला बोल हृदयींचे मधु बोला ॥ ध्रृ० ॥**
**रिझवा ही निज कांता जोड जिवाची मृदु माला ॥ १ ॥**
**कथन करा अनमोल बोल मधुरसा प्रिय बोला ॥ २ ॥**

**पौंड्रक:**—मला ज्या गोष्टीचा आनंद झाला आहे ती गोष्ट तुझ्या दुःखाला कारणीभूत होणारी आहे.

**पुष्प०:**—ती कशी बाई ! अशी कोणती गोष्ट आहे कीं, जिच्यामुळं स्वारीला आनंद वाटून मला दुःख होईल ?

**पौंड्रक:**—कृष्णनाशाची !

**पुष्प०:**—काय म्हणतां महाराज ! कृष्णनाशाची ! कृष्णाचा नाश, भगवंताशीं वैर, यदुवीराशीं विरोध !

**पौंड्रक:**—हो ! त्याच उन्मत्ताशीं विरोध-तुझ्या आवडत्या देवाशीं विरोध, गवळ्याच्या पुंडाशीं या पौंड्रकाचा विरोध आहे. त्याचा एका क्षणांत आतां नाश होणार ! आणि हें पुण्यकर्तव्य हा कृष्ण जातीनं करणार ! माझ्या शत्रूचा नाश माझ्या डोळ्यांना स्पष्टपणें दिसतो आहे. पौंड्रका ! तुझ्या कट्टया शत्रूचा नाश झाला असा अंतःसंदेश मला बजावतो आहे. राणीसाहेब ! या संदेशापेक्षां दुसरा तिसरा आनंदाचा कोणता संदेश असणार आहे.

**पुष्प०:**—महाराज, भगवंताशीं वैर केल्यानं आजपर्यंत कधीं कुणाचं चांगलं झालं आहे का ? प्रागजोतीषपूरच्या सम्राटांनीं भगवंताशीं वैर केलं त्याचा कसा परिणाम झाला हें माहीत नाहीं का महाराजांना ! भगवंताशीं वैर म्हणजे आपल्या हातानं आपलं मरण ओढवून घेणं आहे. महाराज ! नका नका करूं असा आसुरी विचार !

**पौंड्रक:**—राणीसाहेब ! असला विरोध तुम्हीच केलात म्हणून स्वस्थ बसलों ! जर का दुसऱ्या तिसऱ्यानं केला असता तर त्याच्या रक्ताचा सडा या महालांत घातला असता !

**पुष्प०**—महाराज ! आपल्या कल्याणांतच दासीचं कल्याण आहे. म्हणूनच चरणांजवळ पदर पसरून विनंती करतें आहें.

**पद**

**विनवी दासी नरवीरा ॥**
**हेतू मनींचा नच बरा ॥ धृ० ॥**
**द्रोह प्रभूचा प्रभूवरा ॥**
**योग्य नाहीं गुणी वरा ॥**
**प्रेमकलहीं शुची गिरा ॥ १ ॥**

**पौंड्रकः**—राणीसाहेब! याउपर जर असा विरोध कराल तर पत्नीचं नातं झुगारून देऊन, विरोध केल्याच्या दंडविधानाबद्दल कडक शासन आपल्याला भोगावं लागेल.

**पुष्प०ः**—पतीच्या हातून पत्नीला मरण येणं हें पत्नीचं भाग्यच होय. महाराज, आपण आरंभलेलं कार्य परिणामीं चांगलं नाहीं.

**पौंड्रकः**—चांगल्या वाईटाची मला चांगली कल्पना आहे. मी करतों तेंच योग्य आहे. शत्रूला जिवंत ठेवण्यांत पुरुषार्थ नसून त्याला या जगांतून नाहींसा करण्यांतच खरा पुरुषार्थ आहे. सभोंवतीं हजारों शत्रू उरावर थयथय नाचत ठेवून कोणत्याहि राजाला सुखेनैव राहतां येत नाहीं. तुम्हां बायकांना राजनीति मुळींच समजत नाहीं.

**पुष्प०ः**—पुरुषांच्या इतकी जरी समजत नसली तरी थोडीफार समजतेच. बायकांना जर राजनीति समजत नसती तर अदितीनं प्रागज्योतीषपुराचं राजकारण सामोपचारानं संपवलंच नसतं. ज्योतीषसम्राटाच्या वधानंतर भडकलेली राजकारणाची ज्वाला आपल्या कुंडलांनीं तिनं शांत केलीच नसती. पुरुषांची बुद्धि हतबल झाली म्हणजे स्त्रीशक्तीचं कार्य सुरू होतं.

**पौंड्रक०ः**—अदितीचा मूर्खपणाच प्रागज्योतीपपूरच्या राखरांगोळीला कारण झाला. आम्ही सारे तिला मदत करायला तयार असतांना ती त्या नीच कृष्णाला शरण गेली. तिच्या त्या शरणागतीनं आम्हां राजेमहाराजांना खालीं पाहण्याची पाळी आली. याचमुळें तो कुटिल कृष्ण आम्हांला कनिष्ट ठरवूं लागला. मी मघाशीं केलेल्या संकल्पांत याहि गोष्टीच्या सूडाचा समावेश केलेलाच आहे.

**पुष्प०ः**—पण महाराज! भगवंत कांहीं आपल्याशीं वैरानं वागत नाहीं.

**पौंड्रकः**—तुला यांतलं कांहीं एक समजत नाहीं. मी ठरविल्याप्रमाणं त्याचा नाश करणारच. या बाबतींत तुझाच काय पण कोणाचाहि उपदेश मला मान्य होणार नाहीं. यापुढं असला उपदेश केल्यास त्याचा परिणाम केव्हांहि चांगला होणार नाहीं. कृष्ण आणि त्याचे भक्त माझे शत्रू आहेत. माझ्या राज्यांत कृष्णभक्ति ही गुन्हा गणला जातो. म्हणून म्हणतों यापुढं तूंदेखील त्या जार कृष्णाची भक्ति करतां कामा नये. कृष्णभक्ति केल्याचं

माझ्या दृष्टीला पडेल तर तुलादेखील कडक शासन केल्याशिवाय हा कृष्णद्वेषी राहणार नाहीं. [ जातो ]

**पुष्प०**:—मी परोपरीनं सांगून पाहिलं पण त्याचा कांहीं एक परिणाम झाला नाहीं. कृष्णद्वेषाचा परिणाम चांगला होईल असं बाई मला वाटत नाहीं. हृदयस्थ जनार्दना ! या दासीचं सौभाग्य आतां तुझ्याच हातीं आहे. करुणवाणीनं पतिव्रता तुझ्या चरणांजवळ सौभाग्याची भिक्षा मागते आहे.

**पद्**—राग–सारंग ताल–त्रिताल.

**करूं काय देवा सदया वद अबलेला ॥ द्वेष अति भडकला ॥**
**विनवी पदकमला ॥ धृ ॥**
**धीर न उरला या समयाला ॥ क्लान्त जिव झाला ॥**
**करी सुखी पतीला ॥ १ ॥**

---

## प्रवेश तिसरा

**स्थळ**:—रस्ता.

[ **पात्रें**:—विचित्रवीर्य, शिपाई, गांवकरी व केशीराज वगैरे. विचित्रवीर्यानें कृष्णभक्त पकडून आणले आहेत ]

**विचित्र०**:—आजच्यासारखी कामगिरी माझ्या हातून कधींच झाली नाहीं. गुन्हा केला नसतांना गुन्हेगार पकडणं ही कांहीं कमी प्रतीची कर्तबगारी नव्हे. गुन्ह्याचं तत्त्व मान्य, पण केल्याचा तपशील अमान्य. हें माझं शौर्य पाहून महाराज प्रसन्नच होतील. कृष्णभक्तीचा गुन्हा न केलेल्या कुटुंबाला अचानक पकडून आणलं आहे. गुन्हेगाराला कोणीहि पकडील पण गुन्हा न केलेल्याला पकडणं अत्यंत परिश्रमाचं काम आहे. अनुचरा, आण त्या गुन्हेगारांना समोर.

**अनुचर**:—चलारे पुढें.

**लोक**:—अरे बाबा ! अशी धक्काबुक्की कशाला करतां !

**विचित्र०**:—धक्काबुक्की केल्याशिवाय आम्ही सेवक आहोंत हें कसें तुम्हांला समजणार ! धक्काबुक्की हें सेवकाचं तत्त्व आहे.

**लोकः**—तुमच्या तत्त्वानं आमचा प्राण जाईल ना.

**विचित्र०ः**—तुमच्या प्राणाची आम्हाला पर्वा नाहीं. आमच्या प्राणाकरतां तुमचा प्राण गेला तर गेला! स्वतःच्या प्राणरक्षणाचं तत्त्व मान्य, पण दुसऱ्याच्या प्राणाचा तपशील अमान्य. अनुचर! यांनीं कोणता गुन्हा केला?

**लोकः**—आम्ही कोणताच गुन्हा केला नाहीं.

**विचित्र०ः**—गुन्हा केला नाहींत!

**लोकः**—आम्ही निर्दोषी आहोंत!

**विचित्र०ः**—निर्दोषी असणं हाच मुळीं गुन्हा आहे.

**लोकः**—असं कसं म्हणतां!

**विचित्र०ः**—हा प्रश्न तुमचा नसून आमचा आहे. तुम्ही गुन्हा केला नसाल पण आम्हीं म्हणतों तुम्ही गुन्हा केला आहांत. बस्! आणखी काय पाहिजे? पकडण्याचं तत्त्व मान्य, गुन्ह्याचा तपशील अमान्य.

**मुलगीः**—अहो पण माझ्या बाबांनीं गुन्हा केलाच नाहीं.

**विचित्र०ः**—हें मलाच काय पण माझ्या बापालाहि कबूल नाहीं.

**मुलगीः**—किती खोटं बोलतां हो तुम्ही?

**विचित्र०ः**—खरं अगर खोटं पाहण्याचं काम महाराजांचं! त्याच्याशीं मला कांहींएक कर्तव्य नाहीं.

**अनु०ः**—पोरी! यांनीं कृष्णगीत म्हटलं ना?

**मुलगीः**—हो, मग!

**विचित्र०ः**—झालं तर! हाच गुन्हा. पौंड्रपुरांत कृष्णगीत गायचं नाहीं अशी आज्ञा आहे. या आज्ञेचा तुझ्या बापानं गुन्हा केला! म्हणून तुझा बाप, हा तुझा भाऊ आणि तूं याची पोर यांनां अनुचरांनीं पकडलं!

**मुलगीः**—देवाचं नांव घेणं म्हणजे गुन्हा होतो कां हो?

**विचित्र०ः**—गुन्हा! अग मोठा गुन्हा. आमच्या राज्यांत हा तर मोठा गुन्हा, फारच मोठा गुन्हा!

**मुलगीः**—पूर्वी होतं कां हो असं?

**विचित्र०ः**—पूर्वीचं पूर्वीच्या लोकांना माहीत.

**मुलगीः**—बाबा, चला हो घरीं ! आपण कांहीं महाराजांचा गुन्हा केला नाहीं.

**बापः**—पोरी ! आपण असल्या राज्यांत राहिलों हाच मुळीं गुन्हा केला आहे.

**मुलगीः**—तर मग आपण भगवंताच्या द्वारकेला जाऊन राहूं. ती द्वारका किनई फार फार चांगली आहे असं मला मावशी म्हणत होती. चला ना बाबा द्वारकेला !

**विचित्र०ः**—द्वारका ! द्वारका शब्द उच्चारून या पोरीनं पुन्हाः गुन्हा केला आहे. अनुचर ! हें लक्षांत ठेव ! आयत्या वेळीं या सेनापतीला आठवण कर.

**केशी०ः**—( प्र. कृ. ) विचित्रवीर्य ! आज इतकेच लोक पकडलेत ?

**विचित्र०ः**—ही काय कमी कामगिरी झाली महाराज ? माझ्यासारखा एकटा सेनापती आणखीं किती काम करणार ?

**केशी०ः**—महाराज अशानं संतुष्ट होणार नाहींत.

**विचित्र०ः**—मी पूर्ण संतुष्ट झालों आहें.

**केशी०ः**—कृष्णभक्तीचा गुन्हा इतक्यांनींच केला ?

**विचित्र०ः**—पुष्कळ करीत आहेत, पण एकदम साऱ्यांना पकडण्यापेक्षां नित्य नियमानं थोडे थोडे पकडलेले बरे !

**केशी०ः**—छे ! छे ! अशानं भागणार नाहीं ! या बाबतींत मलाच स्वतः कर्तव्य केलं पाहिजे. ( जातो )

**विचित्र०ः**—कर्तव्य करावं हें तत्त्व मान्य, पण स्वतः करण्याचा तपशील अमान्य. चलारे यांना घेऊन चला. ही पोर संभाळा नाहींतर पळून जाईल. पोरी पळण्याची सांथ आहे गांवांत. कृष्णाची स्वारी येऊन गेली आहे, आहे ना ध्यानांत ? चला लौकर.

[ अनुचर लोकांना मारीत नेतात. जातांना लोक "भगवान् श्रीकृष्णा, सोडीव रे भक्तांना" असें म्हणतात. ]

**विचित्र०ः**—तो सोडील तुम्हांला पण इथला नवा श्रीकृष्ण चांगला झोडपील तुम्हांला. आहे कीं नाहीं भावी सेनापती !

---

## प्रवेश चवथा

**पात्रें**:—श्रीकृष्ण, अष्टनायिका, सात्यकी, वृषभकर्ण, नारद, शिशुपाल वगैरे.

अष्टनायिकांचा पिचकाऱ्यांचा नाच चालू आहे.

**अष्टनायिका**:—**पद** ( राग—जिल्हा झिंजोटी—ताल—केरवा. )

**मधु समया या प्रेमें सखया खेळूं झणीं या ॥**
**प्रमुदित करुं या यदुवर सखी या ॥ धृ० ॥**
**घ्या पिचकारी करिं या हळूहळू सोडुनी ॥**
**रंगुं या ॥ साडी भिजली मौज झाली ॥**
**प्रमुदित झालीं हृदयें सगळीं ॥ करूं गुणगान,**
**शामल श्रीमान ॥ हरपुनी भान यदुवर ध्यान ॥ १ ॥**

[ नृत्य वगैरे झाल्यावर नायिका जातात. ]

**श्रीकृष्ण**:—अदितीच्या विनंतीवरून वराहअवतारांत ज्योतिषपुराचं राजकारण तिच्या मनाप्रमाणं केलं त्याचं शल्य पौंड्रकाच्या मनांत या अवतारीं सलत आहे. याच मुद्यावर त्यानें माझ्याशीं विरोध भक्तीनं स्पर्धेचा खेळ सुरू केला आहे. भोळ्या आणि भाविक भक्तांच्या सरळ भक्तीपेक्षां मला विरोध-भक्तीचं कौतुकच वाटतं. विरोधी भावानं वागणारा माझा प्रत्येक भक्त मला मनापासून आवडतो. माझ्या गेल्या साती अवतारांत मी याचा अनुभव चांगल्या प्रकारें घेतलेला आहे. पौंड्रकाच्या विरोधाचा परिणाम व्हायचा तसाच होणार ! जगाच्या नियमाला हा तरी कसा अपवाद ठरणार ! खरोखरच विश्व-वैचित्र्याची एक अजब गंमतच आहे.

**पद**—राग—सुरदासी मल्हार ताल त्रिताल.

**जगत्रय चाले त्या नियमे कोणी न चाले ॥ धृ० ॥**
**खलबली तो नर डोले विभवा मुकले ॥**
**बिदा नर भंग करी नर बोले ॥ १ ॥**

माझ्याशीं प्रतिस्पर्धा करण्यांत पौंड्रकाचा जर शुद्ध हेतू असता तर त्याला मुक्तीचा मार्ग मी दाखविला असता; परंतु निव्वळ अहंमन्यतेच्या जोरावर, अंगीं योग्यता नसतांना एखाद्याशीं प्रतिस्पर्धा करणारीं जीं माणसं असतात

त्यांपैकींच पौंड्रक हा आहे. अशा माणसांनीं योग्य शासन केलंच पाहिजे. असल्या मूर्खांकडे कानाडोळा केला तर यांचा उन्मत्तपणा वाढीला लागून हींच माणसं जगाला तापत्रय होतात. सात्यकी !

**सात्यकीः**—प्रभूंचा जयजयकार असो.

**श्रीकृष्णः**—पौंड्रकाच्या राजकारणाबाबत सांगितल्याप्रमाणें तयारी करा. आज ना उद्यां त्याच्यावर स्वारी करावी लागणारच. सर्व यादव वीरांना आगाऊच इषारा द्या. द्वारकेच्या संरक्षणार्थ निवडक वीर ठेवून दादांच्या नेतृत्वाखालीं त्यांवर नगररक्षणाची कामगिरी सोंपवा.

**सात्यकीः**—प्रभूच्या आज्ञेप्रमाणं सर्व व्यवस्था करतों. थोरल्या महाराजांनीं आतांच अशीच अनुज्ञा केली आहे दासाला ! पण महाराज ! पौंड्रकाचा आपल्याशीं इतका विरोध तरी कां असावा !

**श्रीकृष्णः**—सात्यकी ! ही विश्वाची एक प्रकारची घडामोड आहे. हा मानवी मनाचा एक चमत्कारिक खेळ आहे. अज्ञांनीं सुज्ञांशीं प्रतिस्पर्धा करावी, सत्ताविहीनांनीं सत्ताधीशांशीं स्पर्धा करावी, दानवांनीं देवांच्या अप्रतिष्ठेचा डाव टाकावा, दुर्बलांनीं बलवान् होण्याचं कार्य बाजूला टाकून बलवंतांशीं कलह मांडावा, दैवावर सर्वस्वी भरंवसा ठेवणाऱ्यांनीं प्रयत्नवाद्यांना कुटिलतेने खालीं ओढण्याचा प्रयत्न करावा, असे विविध चमत्कार या जगांत चालूच आहेत. अशाच चमत्कारांपैकीं पौंड्रकाच्या स्पर्धेचा एक चमत्कार आहे.

**सात्यकीः**—म्हणजे महाराज ! हा पुरुष–पुरुषोत्तमाचाच लढा आहे म्हणायचा.

**श्रीकृष्णः**—बरोबर ओळखलंस सात्यकी. हा पुरुष पुरुषोत्तमाचाच लढा आहे.

**सात्यकीः**—या लढ्याचं स्वरूप चुकीचं नाहीं का महाराज ?

**श्रीकृष्णः**—तें कसं ?

**सात्यकीः**—पुरुषानं पुरुषोत्तमाशीं स्पर्धा करावी, परंतु त्याचा हेवा अगर मत्सर करून स्पर्धेचा डाव खेळूं नये. पुरुषानं प्रयत्नाच्या जोरावर, शुद्ध चारित्र्यावर पुरुषोत्तम बनून पुरुषोत्तमाशीं स्पर्धा करावी.

**श्रीकृष्णः**—पौंड्रकाच्या कलहानं हेंच प्रमेय मी सर्व विश्वाला पटवून देणार

आहें. योग्य पुरुषाप्रमाणं प्रयत्नाची कास धरून योग्य बनावं हीच खरी स्पर्धा होय. पण पौंड्रकासारखे अदूरदर्शी प्राणी या उचित मार्गांची पायमल्ली करून भलताच मार्ग चोखाळतात आणि शेवटीं हीच त्यांचीं अयोग्य कार्यप्रणाली त्यांच्या नाशाला कारणीभूत होत असते.

**पद्**—राग विहाग ताल—त्रिताल.

**समजत ना मनुजा विधी शासन ॥**
**योग्य समीक्षण ॥ धृ० ॥ विसरुनी समता ॥**
**कलह करी प्रबल घात असुहनन ॥ १ ॥**

**सेवकः**—पौंड्रकाचे सेवक प्रभुदर्शनाची प्रतीक्षा करीत आहेत.

**श्रीकृष्णः**—सात्यकी ? त्यांना सत्कारानं घेऊन ये.

**सात्यकीः**—जशी प्रभूची आज्ञा. ( जातात. )

[ सात्यकीसह वृषभकर्ण व शिशुपाल येतात. ]

**श्रीकृष्णः**—बसा त्या आसनावर ! पौंड्रकांचं काय म्हणणं आहे ?

**वृषभ०ः**—पौंड्रकांचं ? मी हुकमाचा ताबेदार आहें. माझ्या महाराजांना—भगवान् वासुदेवांना—पौंड्रक म्हणणं मला बिलकूल पसंत नाहीं. त्यांना प्रत्येकानं भगवान् वासुदेव—भगवान् श्रीकृष्ण असंच म्हटलं पाहिजे.

**सात्यकीः**—तें तुझ्यासारख्या मूर्खानं म्हणावं, आम्हांला तसं म्हणण्याचं मुळींच कारण नाहीं.

**वृषभ०ः**—मी मूर्ख ? हा हुकमाचा ताबेदार मूर्ख ?

**शिशु०ः**—हा भगवान् वासुदेवांचा अपमान होतो आहे. आम्ही भगवान् वासुदेवांकडून आलों आहोंत. आमचा जर अपमान झाला तर तो पौंड्रकांचाच अपमान होय.

**श्रीकृष्णः**—सात्यकी ! जाऊं दे. याच्या महाराजाला आपणहि भगवान् वासुदेव म्हणूं. एखाद्याला जर मोठ्या नांवाची हौस असेल तर ती आपण तरी कां पुरी करूं नये ?

**सात्यकीः**—मोठ्या नांवानं मोठेपणा येतो कां महाराज !

**श्रीकृष्णः**—येत नाहीं हें खरं ! पण पौंड्रकाला जर तसा येत असला तर

येऊं दे. बोला–हुकमाचे तांबेदार–बोला, तुमच्या भगवान् वासुदेवाचा काय निरोप आहे ?

**शिशु०:**—भगवानांचा असा निरोप आहे कीं, तूं माझं सुदर्शन, कीरीट-कुंडलं, शंख–चक्र–पद्मादि भूषणं चोरून आणलीं आहेस—

**वृषभ०:**—इतकेंच नव्हे तर तीं अंगावर धारण करून तोतया कृष्ण तोतया वासुदेव म्हणून मिरवीत आहेस.

**शिशु०:**—तेव्हां हीं सर्व भूषणं परत दे अगर युद्धाला तयार हो.

**वृषभः**—मुकाट्यानं जर दिलीं नाहींत तर भगवान् श्रीकृष्ण तीं युद्धांत जिंकून घेतील. असा या हुकमाच्या तांबेदाराला भगवान् वासुदेवाचा निरोप कळविण्याचा हुकूम आहे. हुकूम कळविला आहे. ( जायला निघतो. )

**शिशु०:**—चाललांत कुठं ?

**वृषभः**—हुकूम कळविला, माझं काम झालं.

**शिशु०:**—याचं उत्तर नको का ऐकायला ?

**वृषभः**—तें काम माझं नाहीं. तुम्ही ऐका. आतां तुमच्याकरितां मी इथं उभा राहतों.

**शिशु०:**—काय सांगूं याचं उत्तर–भूषणं देणार कीं युद्धाला तयार होणार ?

**सात्यकीः**—तुमच्या मूर्ख राजाला कळवा कीं, चालविलेला मूर्खपणा सोडून दे.

**शिशु०:**—त्यांच्या मनानं तुमच्याच महाराजांनीं मूर्खपणा चालविलेला आहे.

**सात्यकीः**—अधमा, अभद्र वाणीबद्दल हें घे बक्षीस.

**श्रीकृष्णः**—सात्यकी, थांबा ! इतक्यांत हें प्रकरण हातघाईवर आणूं नका ! शिशुपाल, हीं कीरीटकुंडलं, सुदर्शन तुझ्या मित्राला वापरायला का पाहिजेत ?

**शिशु०:**—वापरायला नव्हे ! हीं त्यांच्या मालकीचींच आहेत.

**वृषभ०:**—हो ! तीं आमच्या महाराजांचींच आहेत. चटकन् द्या आणि पटकन् आम्हांला मोकळे करा.

**श्रीकृष्णः**—हीं भूषणं त्यांचीं आहेत ?

**शिशु०**:—यांत काय शंका ! तीं महाराजांचीं असून तूं तीं चोरून आणलीं आहेस.

**श्रीकृष्णः**—शिशुपाल, मला तुझी कींवच करावीशी वाटते.

**शिशु०**:—यांत कींव करण्याचं काय कारण ! शिशुपालाची कोणीहि कींव करावी असा हा केविलवाणा नाहीं. शिशुपालाच्या बाबतींत दयेचे बोल फोल आहेत. ज्याच्या मनगटांत जोर नसेल, ज्याच्या बाहूंत प्रबल पराक्रम नसेल, ज्याला मृत्यूवर विजय संपादन करतां येत नसेल, असेच अजागळ कींव करण्याच्या योग्यतेचे असतात; पण हा शिशुपाल तसा नाहीं.

**श्रीकृष्णः**—निष्फळ उद्दाम भाषा वीराला शोभत नाहीं. शिशुपाला, ज्या अर्थी तूं तुझ्या मित्राच्याकरतां या भूषणांची भीक मागायला आला आहेस, त्या अर्थी तुझा हा अभिनिवेश फोल आहे.

**शिशु०**:—भीक मागण्याकरतां या शिशुपालाचा जन्म नाहीं. क्षत्रियांना याचना मरणप्राय असते. जो क्षत्रिय याचना करील, भिक्षेचा मार्ग अवलंबील तो मुळीं क्षत्रियच नव्हे.

**श्रीकृष्णः**—इतका शहाणपणा तुझ्या अंगीं असतांना कीरीटकुंडलांची भिक्षा मागायला द्वारकेंत कशाला आलास ? भिक्षेनं मागणी पुरी होत नाहीं, याचनेनं मालकीची वस्तू प्राप्त होत नाहीं, याची जाणीव तूं तुझ्या क्षत्रिय मित्राला कां करून दिली नाहींस ? एकीकडे क्षत्रियत्वाची पोकळ घमेंड मारणाऱ्यांनीं क्षत्रिया-सारखी वागणूक नको का करायला ?

**शिशु०**:—क्षत्रियाची वागणूक !

**श्रीकृष्णः**—हो हो, क्षत्रियाची वागणूक ! क्षात्रतेजाचा भंग करून पुन्हां उन्मत्तपणानें मला विचारतोस !

**शिशुः**—ही पहा, ही गदा माझं क्षात्रतेज दाखवायला सिद्ध आहे. चल हो तयार आणि या क्षत्रियाचा पराक्रम पुन्हां एकवार पटवून घे.

**श्रीकृष्णः**—तुझ्या उन्मत्त मित्राला कीरीटाच्या याचनेचं उत्तर ही माझी गदा आतांच्या आतां देईल. चल तयार हो.

**नारदः**—( प्र. क. ) वचनभंग ! देवा वचनभंग होतो आहे.

**श्रीकृष्णः**—तो कसा !

**नारदः**—देवा ! आपण शिशुपालाच्या मातेला वचन दिलं आहे ना कीं, याचे एकशें एक अपराध भरेपर्यंत याच्यावर शस्त्र उचलणार नाहीं म्हणून.

**श्रीकृष्णः**—अरे हो ! तें मी विसरलोंच.

**नारदः**—मी आपली आठवण करून दिली !

**श्रीकृष्णः**—जा शिशुपाल. माझं वचन पाळण्याकरतां मी तुला सोडून दिलं आहे.

**नारदः**—नमो भगवते वासुदेवाय !

**श्रीकृष्णः**—त्या उन्नत राजाला सांग कीं, सुदर्शन चक्र मुळींच मिळणार नाहीं. जर तुला तें हवं असेल तर युद्धांत जिंकून घे. युद्धाला माझी तयारी आहे.

**शिशु०**ः—असाच निरोप कळवूं ?

**श्रीकृष्णः**—जा असाच निरोप कळीव.

**शिशु.**—ठीक आहे [ दोघे जातात. ]

**नारदः**—देवा ! कुरुपुरांत पौंड्रपुरांत त्या उन्मत्त पौंड्रकानं तुझ्या भक्तांचा अनन्वित छळ चालविला आहे.

**श्रीकृष्णः**—काय ! माझ्या भक्तांचा छळ ! सात्यकी ! आत्तांच्या आतां रथ तयार करा. भक्तांच्या साहाय्याकरतां मला गेलंच पाहिजे.

राग–अडाणा ताल–त्रिताल

**धांवे प्रभू सदा दीनार्थ सर्वथा ॥ धृ० ॥**
**वारुनी अपदा करी प्रतिपालन ब्रीदही माझें शुचिता ॥ १ ॥**

---

## प्रवेश पांचवा

**स्थळः**—वृषभकर्णाचें घर.

**पात्रेंः**—विचित्रवीर्य व धेनुमती.

**धेनु०**ः—राणीसाहेबांची कृष्णभक्ति पाहून मलादेखील त्या भक्तीचं अगदीं वेडच लागून गेलं आहे. आजन्म अविवाहित राहून कृष्ण भगवंतांची सेवा करावी असं मला वाटतं. खरोखरीच जन्माचं सार्थक यांतच आहे. संसारांत

आयुष्याचं मातेरं करण्यापरीस देवाच्या सेवेंत भक्तीचा संसार केला तर मनाचं नि चित्ताचं खात्रीनं समाधान होईल. मी बाई यापुढं लग्नाचा विचार सोडून देऊन कृष्णभगवानाच्याच सेवेंत आपलं आयुष्य घालविणार आहें. राणी-साहेबांच्या उपदेशाप्रमाणं मी आजपासून वागणार. राणीसाहेबांनीं केलेलं कृष्णगीत किती तरी मजेदार आहे! कितीदां म्हटलं तरी तें पुन्हां पुन्हां म्हणावंसं वाटतं.

**पद** ( राग–हमीर ताल–त्रिताल )

**मोहि मुरली मोहन गिरीधारी ॥**
**बाई सुजन मुदित झाला ॥**
**गाई कुंजविहारी ॥ १ ॥**
**कुठवर पाहूं मीं मोहन, झालें गुंग रूपीं ॥**
**खेळे हृदयाविहारी ॥ १ ॥**

**विचित्र०**:—अरे, माझ्या भावी सासुरवाडीं कृष्णाचं गुणवर्णन! गुन्हा, महाभयंकर गुन्हा! छे! छे! हा गुन्हा मला बिलकूल पसंत नाहीं. कृष्णाचं वर्णन करणारा आमच्या राज्यांत गुन्हेगार ठरतो.

**धेनु०**:—किती सुंदर हें गाणं आहे बाई! बाबा आले कीं हें त्यांना म्हणून दाखवीन.

**विचित्र०**:—तूं हें काय चालवलं आहेस! कुणाचं गाणं म्हणतेस ठाऊक आहे कां तुला?

**धेनु०**:—मला पूर्ण माहित आहे, मी हें कृष्णभगवानाचं गाणं म्हणतें आहें.

**विचित्र०**:—हा गुन्हा घडला आहे तुझ्या हातून!

**धेनु०**—यांत कसला गुन्हा! तुम्हांला कांहीं अक्कल आहे कां हो?

**विचित्र०**:—अकलेचं तत्त्व मान्य, पण प्रमाणाचा तपशील अमान्य.

**धेनु०**:—चुलींत गेलं तुमचं तत्त्व.

**विचित्र०**:—हं! हा दुसरा गुन्हा! तत्त्व मान्यतेचं राजकारण सदैव निर्दोषी असतं. त्यांत सहकार्य असतं. सम्राटाची कृपा संपादून तपशिलाच्या

अमान्यतेवर आपलं आसन स्थिर करायला याच्यासारखं साधन नाहीं. सेनापतीची जागा याच तत्त्वावर मी मिळविणार आहें.

**धेनु०**:—ही तुमची दुटप्पी नी दुहेरी वृत्ति मला मुळींच आवडत नाहीं.

**विचित्र०**:—हीच वृत्ति माझ्यासारख्या मुत्सद्याला संजीवनी आहे संजीवनी! अग आहेस कुठं!

**धेनु०**:—माझ्या घरांतच.

**विचित्र०**:—घराचं तत्त्व मान्य, पण माझेपणाचा तपशील अमान्य! हा वाद राहूं दे. कृष्णगीत गाऊन तूं महाराजांच्या नव्या आज्ञेप्रमाणं गुन्हा केला आहेस. तेव्हां मी तुला पकडून महाराजांसमोर उभी करणार आहें.

**धेनु०**:—हा मुळीं गुन्हा होतच नाहीं.

**विचित्र०**:—होतो कीं नाहीं हें मला समजत नाहीं.

**धेनु०**:—मी तरी तेंच म्हणतें!

**विचित्र०**:—काय म्हणतेस?

**धेनु०**:—तुम्हांला कांहीं देखील समजत नाहीं.

**विचित्र०**:—न समजण्याचं तत्त्व मान्य, पण कांहींचा तपशील अमान्य. मला समजत नसलं तरी महाराजांना समजत आहे त्याला मी काय करूं! तें कांहीं नाहीं. तुला पकडून महाराजांसमोर उभी केलीच पाहिजे. चल— माझ्याबरोबर चल.

**धेनु०**:—मी नाहीं तुमच्याबरोबर येणार!

**विचित्र०**:—मग मी तुझ्याबरोबर येतों. चल लवकर.

**धेनु०**:—तुम्ही इथं आलांत कां?

**विचित्र०**:—गुन्हेगाराचं संशोधन करण्याचं काम माझ्याकडे आहे. आम्हांला वाटेल तेथें जाण्याचा अधिकार आहे. तुझ्या येथेंच काय पण वाटेल तिच्या येथें जाण्याचा आम्हांला अधिकार आहे. गुन्हेगार शोधून काढण्याकरतां वाटेल त्या घरांत वेळीं अवेळीं आम्हांला फिरलंच पाहिजे. चल, मुकाट्यानं चल. (स्व.) आतां बघतों लग्नाला कशी कबूल होत नाहीं ती?

**धेनु०**:—मी नाहीं येणार!

**विचित्र०**:—तूं नाहीं येणार पण मी तुला नेणार! चल—

**धेनु०**:—हं दूर व्हा. दुसऱ्याच्या पोरीच्या अंगाला हात काय लावतां!

**विचित्र०**:—ही दुसऱ्याची पोर असली तरी आपलेपणानं हात लावायला काय हरकत आहे? चल एकदम. ( तिचा हात धरतो )

**अनु०**:—( प्र. क. ) अगबाई! जमलं वाटतं सूत—धेनू—चांगलं चांगलं झालं बाई!

**विचित्र०**:—अजून कुठं चांगलं झालं आहे! चांगलं व्हावं म्हणून तर प्रयत्न चालविलेला आहे.

**अनु०**:—विचित्रवीर्य! म्हणूं का मंगलाष्टक?

**विचित्र०**:—अग इचं आणि माझं अजून खडाष्टकच चाललं आहे. इतक्यांत कसलं म्हणतेस मंगलाष्टक! मंगलापूर्वीचं मंगलाष्टक मला कबूल नाहीं.

**धेनु०**:—सोडा पाहूं माझा हात.

**अनु०**:—लाजूं नको अशी! मी तुझी मैत्रीण नाहीं का!

**धेनु०**:—अनु! पुरे झाला चहाटळपणा.

**अनु०**:—मी तरी तेंच म्हणतें तुला! अग तुला मी कृष्णकीर्तनाला बोलावयाला आलें नी तुझं हें दुसरंच कीर्तन चाललं आहे.

**विचित्र०**:—कृष्णकीर्तन! अनु! तूं देखील गुन्हेगार आहेस.

**अनु०**:—मी काय गुन्हा केला!

**विचित्र०**:—कृष्णकीर्तन हा शब्द उच्चारण्याचा. चल, हिच्याबरोबर तूंहि महाराजांकडे चल. दोघींना घेऊन गेलंच पाहिजे. ( दोघींचे हात धरतो ) काय माझं भाग्य तरी! वाहवा! आतां मी—

**वृषभ०**:—( प्र. क. ) बहकलेले तरुण दिसतां, शुद्ध उल्लू दिसतां! चांगली कामगिरी बजावतां ही! छे! छे! तुम्हांलाच महाराजांपुढं उभं केलं पाहिजे. चला अगोदर माझ्याबरोबर.

**विचि०**:—चलण्याचं तत्त्व मान्य. बरोबरीचा तपशील अमान्य. ( वृषभकर्णाबरोबर जातो. )

**धेनु०**:—चांगली फजिती झाली.

**पद**–कवाली.

**झाली फजिती छान मजेची गंमत कशी झाली ॥**
**बुद्धीहीन नर मूर्ख कसा हा नाहीं समज मज बाई ! झाली ॥ धृ० ॥**
**कोण वरील या गुणी बाळाला ॥ वृद्ध तरुणी नच भोळी काळी ॥१॥**

**अनु०**:—चल बाई लवकर. राणीसाहेब वाट पहात असतील ( जातात. )

---

## प्रवेश सहावा

**स्थळ**:—उद्यान.

**पात्रें**:—[ लोक, पुष्पवती, पौंड्रक, धेनु, अनु, वृषभकर्ण वगैरे. कृष्ण, सात्यकी व नारद ]

**पौंड्रक**:—वृषभकर्ण ! पकडा या लोकांना ! हे सारे गुन्हेगार आहेत.

**वृषभ**:—हुकमाचा ताबेदार तयार आहे. पकडा रे यांना.

**गृहस्थ**:—अहो आम्ही गुन्हा तरी काय केला ?

**पौंड्रक**:—माझ्या शत्रूचं संकीर्तन केलंत ! त्या अधमाधम तोतयाचं गुणगान केलंत !

**गृहस्थ**:—राणीसाहेबांच्या अनुज्ञेनं आम्ही त्यांच्या आराध्यदेवतेचं गुणगान केलं !

**पौंड्रक**:—काय ! राणीसाहेबांनीं तुम्हांला अनुज्ञा दिली !

**पुष्प०**:—( प्रवेश करते ) होय महाराज ! मीच यांना अनुज्ञा दिली !

**पौंड्रक**:—विचित्रवीर्य ! यांनाहि पकडा. या मुख्य गुन्हेगार आहेत.

**पुष्प०**:—महाराज ! कृष्णभक्तीच्या गुन्ह्याबद्दल मी वाटेल तें शासन भोगायला तयार आहें.

**पौंड्रक**:—राणीसाहेब ! आमच्या विरुद्ध तुम्ही ही बंडाळी चालविली आहे. आमच्या शत्रूचं तुम्ही गुणकीर्तन करून तुम्ही आमच्याशीं विद्रोह केला आहे. त्याचं योग्य शासन तुम्हांला मिळालंच पाहिजे.

**पुष्प०**:—महाराज ! ही बंडाळी मुळींच नाहीं ! परमेश्वराचं गुणकीर्तन हा विद्रोह नाहीं. चराचरांत व्यापून राहणाऱ्या परमात्म्याची भक्ति हा गुन्हा नाहीं. आपल्याला हा गुन्हा वाटत असला तरी खऱ्या दृष्टीला हा गुन्हा वाटत नाहीं. महाराज !

**पद** ( राग–पिलु–ताल त्रिताल. )

**ना सखीचा दोष झाला नाथ कां हो कोपला ॥**
**कृष्णप्रेमा रंग भरला जीव गानीं गुंगला ॥ धृ० ॥**
**कृष्णद्वेष न चांगला सौख्य नच मुळीं सोज्वला ॥**
**दासी विनवी योग्य काला स्नेह जडवा मंगला ॥ १ ॥**

**पौंड्रक**:—तुमची अक्कल आम्हांला नको. आमच्या मतानं तुम्ही आणि हे सारे लोक गुन्हेगार आहांत. वृषभकर्ण ! या साऱ्यांना अंधार–कोठडींत डांबून ठेवा. द्वारकेवर विजय मिळवून आल्यावर यांचा निर्णय करूं.

**वृषभ०**:—हुकमाचा ताबेदार तयार आहे.

**पुष्प०**:—महाराज ! या बिचाऱ्यांचा यांत कांहींच अपराध नाहीं. आपण मला वाटेल तें शासन करा, पण या निर्दोषी माणसांना क्षमा करा. माझ्या विनंतीवरून यांनीं कृष्णकीर्तनाच्या सोहाळ्यांत भाग घेतला. महाराज ! क्षमा करा.

**पौंड्रक**:—तें कांहीं नाहीं. वृषभकर्ण ! आज्ञेप्रमाणं वर्तन करा. ( जातो )

**वृषभ०**:—चला रे.

**लोक**:—आम्ही येणार नाहीं.

**वृषभ०**:—अनुचरांनो ! एकेकाला चांगला प्रसाद द्या. म्हणे येणार नाहीं !

[ पौंड्रकाचे सेवक लोकांना निर्दयपणानें मारतात. ]

**पुष्प०**:—देवा ! तुझ्या भक्तांचा छळ तुला पाहवतो तरी कसा ?

**पद**—( राग–बागेश्री ताल–दीपचंदी. )

**कोठें गुंतलासी द्वारकेच्या देवा ॥**
**दासी करी धांवा भक्तीं भावा ॥ १ ॥**
**काय घेशी निद्रा तारका गजेंद्रा ॥**
**झडकरीं धांवा प्रिय देवा ॥ २ ॥**

ब्रीद बोललासी भक्तवत्सलाचें ॥
होई कां फुकाचें देवाधिदेवा ॥ ३ ॥
कोठें गेली भक्ती आली कां सुषुप्ती ॥
भ्रांत पडे जीवा घेशी कां विसावा ॥ ४ ॥
सख्य भक्तीसाठीं पडे जीव तुटी ॥
प्राण ह्या संपुटी आला देवा ॥ ५ ॥

**कृष्णः**—( प्र. क. ) पुष्पवती ! हा भक्तांचा पाठीराखा यांच्या संरक्षणाकरतां तयार आहे.

**नारदः**—नमो भगवते वासुदेवाय !

**पुष्प०ः**—देवा ! दासी आज धन्य झाली.

**कृष्णः**—सोडा रे यांना. यांच्या अंगाला हात लावाल तर खबरदार.

**नारदः**—वृषभकर्ण, महाराज काय सांगताहेत ?

**विचित्र०ः**—तत्त्व मान्य, तपशील अमान्य.

**कृष्णः**—सोडतां किंवा नाहीं ? सात्यकी यांची मुक्तता कर.

**वृषभ०ः**—मी काय हुकमाचा ताबेदार. सोडा म्हटलं. सोडलंच पाहिजे. जा, तुम्हांला सोडून दिलं आहे.

**नारदः**—देवा ! हेंच खरं भक्तवात्सल्य.

**लोकः**—श्रीकृष्णजीकी जय !

**नारदः**—

पद ( राग–जिल्हा ताल–केरवा )

नच कळत तव लीला
नमवी दीन दास भाला ॥
प्रार्थी अघ काळीं भक्त उदारा
पाळीसी ब्रिदाला ॥ १ ॥

**अंक दुसरा पूर्ण.**

---

# अंक तिसरा



## प्रवेश पहिला

**स्थळ**—कुरुषपूर.

**पात्रें**—नारद, शिशुपाल, केशीराज.

**शिशु०ः**—कृष्णानं माझा अपमान केल्यापासून माझ्या अंतःकरणांत नुसती तळमळ चालली आहे. या अपमानाचा सूड केव्हां घेईन असं मला झालं आहे. तो कळलाव्या तर गदेच्या एका प्रहारानं चक्काचूर केला असता. क्षात्रतेजाचे धडे या शिशुपालाला शिकवणाऱ्या गवळ्याच्या गुंडाला एका निमिषांत या जगांतून नाहींसा केला असता. माझा तेजोभंग करणारा नारद जर मला भेटेल तर त्याला अस्सा खडखडीत जबाब विचारीन.

**पद** ( भजन–धुमाळी. )

**नारदः**—नमो भगवते वासुदेवाय.

**नंद कुमारा कृष्ण मुरारी गोकुलीचा**
**पालनवाला ॥ गाई मुनी हा दास**
**तुझा मी नत करीं पदीं या**
**प्रेमविमोही ॥ दे वरद देवा**
**वांछी कालीं कान्हा काला**
**बन्सीवाला ॥ १ ॥**

**शिशु०ः**—नांव घेतांच दत्त म्हणून उभा !

**नारदः**—शिशुपाला ! आज बराच रागावलेला दिसतो आहेस. पौंड्रकाचा आणि तुझा मतभेद झाला कीं काय ! कृष्णनाशाची वेळ जवळ आली असतांना मतभेद होणं बरं नाहीं. शत्रु अंगावर चाल करून येत असतां, राजे लोकांत फूट पडली तर विजयश्री कशी मिळणार !

**शिशु०ः**—मरूं दे तो कृष्ण ! त्याचं पुन्हा नांव देखील काढूं नका.

**नारद**ः—शाबास ! अजूनहि तुझ्या अंतःकरणांत कृष्णद्वेषाचा अग्नि पेटतो आहे ही अत्यंत समाधानाची गोष्ट आहे. यामुळं तुझ्या हातून खात्रीनं कृष्णनाश होईल अशी मला आशा वाटूं लागली आहे.

**शिशु०**ः—कृष्णाचं प्रस्थ तुमच्यासारख्यांनीं माजवावं.

**नारद**ः—तें मला कबूल आहे. पण माझ्यासारख्या भटकणाऱ्यांनीं जरी त्याचं प्रस्थ माजविलं तरी या बाबतींत मी तुम्हांला मदत करतों आहें ना ! कृष्णापेक्षां तुम्ही मला फारच प्रिय आहांत ! तसं नसतं तर ही नसती भानगड मी तरी कशाला केली असती. मी पहिल्यापासून तुम्हांला का मदत केली ! नाहीं तूंच सांग. मला ही उठाठेव करण्याचं कांहीं कारण का होतं ?

**शिशु०**ः—तुमचं माझ्यावर प्रेम आहे ?

**नारद**ः—आहे म्हणून काय विचारतोस ! तसं नसतं तर—

**शिशु०**ः—रुक्मिणी कृष्णाला कशी मिळवून दिली असतीत !

**नारद**ः—त्यांतहि माझं तुझ्यावरचं प्रेम होतं !

**शिशु०**—तें कसं !

**नारद**ः—असं विचार ! अरे मी जर तुझी भावी वधू कृष्णाला मिळवून देण्याचं कृत्य केलं नसतं आणि ती तुला मिळाली असती तर कृष्ण तुझा शत्रूच झाला नसता.

**शिशु०**ः—याचा अर्थ ?

**नारद**ः—अगदीं सरळ आहे ! शत्रु असावा तर मोठा असावा. कित्येकदां प्रतिस्पर्ध्याच्या श्रेष्ठतेमुळं त्याच्या शत्रूला मोठेपणा येत असतो. लहानसान शत्रूशीं प्रतिस्पर्धा करण्यांत प्रतिस्पर्ध्याचा कमीपणा असतो. प्रतिस्पर्धी नेहमीं आपल्यापेक्षां श्रेष्ठ असावा, काय समजलांत !

**शिशु०**ः—हें मला कबूल आहे. कृष्णासारख्याचा मी प्रतिस्पर्धी आहें ही माझ्या लौकिकांत अपूर्व भरच आहे.

**नारद**ः—( स्व. ) अजून तुझा लौकिक व्हायचा आहे. ( उ. ) कसं योग्य बोललास बरं ! बरं, पण तुझा साथीदार केशीराज कुठं आहे ?

**केशी०**ः—( प्र. क. ) शिशुपाल, तो कुटील कृष्ण कुरुषाच्या हद्दीजवळ आला आणि तूं इथंच काय उभा राहिला आहेस.

**शिशु०**:—कुठं आहे तो कुटिल कृष्ण !

**केशी०**:—कुरुषाच्या हद्दीच्या बाहेर आला आहे. त्याच्या आगमनाची वार्ता पौंड्रक महाराजांनां समजतांच ते त्याच्यावर एकटेच चाल करून जायला निघाले आहेत.

**नारद**:—तुमच्या संमतीशिवाय ! तुमच्या मदतीशिवाय !

**केशी०**:—होय ! मी त्यांना तसं म्हणालों पण गर्वानं त्यांनीं आमचा अपमान होईल असे बोल काढले !

**नारद**:—पहा ! शिशुपाल, केशीराज, ऐनवेळीं हा तुमचा मित्र पौंड्रक विजयाचं श्रेय तुम्हांला दूर लोटून स्वतः मिळविणार ! छे छे ! मी जर तुमच्या जागीं असतों तर पौंड्रकाला सोडून एकदम निघून गेलों असतों. असला अपमान मी तरी कधीं कधीं सहन केला नसता बुवा !

**शिशु०**:—तो पौंड्रक अशा दर्पोक्तीनं बोलला !

**केशी०**:—मी त्याला खडखडीत जबाब दिला !

**नारद**:—काय जबाब दिलास राजा !

**केशी०**:—कृष्णनाश करायला मी एकटा खंबीर आहें. काशी नगरीवर तो चाल करून आला असतांना या केशीराजानं कृष्णाचा पराभव केलेला आहे. कृष्णनाशाचं श्रेय एकट्या पौंड्रकानं संपादन करावं हें आम्हांला मुळींच पसंत नाहीं. कृष्णनाशाचं श्रेय आमच्या पदरीं पडलं पाहिजे.

**नारद**:—हें अगदीं बरोबर. खटपट तुम्ही करायची—

**शिशु०**:—अपमान आम्ही सहन करायचा—

**नारद**:—हो ! अपमान तुम्ही सहन करायचा आणि यश मात्र पौंड्रकानं पटकावयाचं ! छे ! ही गोष्ट तुम्ही कधींहि सहन करूं नका !

**शिशु०**:—आम्हीच त्याचा नाश करूं.

**केशी०**:—कृष्णनाशाचं कार्य आम्हांलाच केलं पाहिजे.

**शिशु०**:—मुनिवर्य, जातों आम्हीं. कृष्णनाशाचं कार्य पौंड्रकाच्या अगोदर आम्हांलाच केलं पाहिजे.

**नारद**:—तें तुम्हीं करालच. पण कुरुषपुरांत जर हें कार्य झालं तर सर्व श्रेय

पौंड्रकालाच मिळणार. तुम्ही कार्य करायचं आणि श्रेय मात्र पौंड्रकाच्या पदरीं पडायचं ! असं करूं नका.

**केशी०**:—मग कसें करूं तें सांग !

**नारद**:—कृष्ण, कुरुषनगरीच्या बाहेर उतरला आहे, तेव्हां तुम्ही दोघांनीं त्याला आपल्या सैन्याची तयारी करून परस्पर गांठा आणि त्याचा नाश करा.

**शिशु०**:—ही युक्ति छान आहे.

**केशी०**:—पण त्याच्या पूर्वींच पौंड्रकांनीं त्याचा वध केला तर ?

**नारद**:—हो ! ही अडचण माझ्या ध्यानांत आली नाही. आतां काय बरं करावं ? हं ! मी तुमची ही अडचण दूर करतों. तुम्ही सैन्य जमवून येईपर्यंत मी पौंड्रकाला कुठल्या तरी रीतीनें थांबवून ठेवतों म्हणजे झालं.

**शिशु०**:—ठीक आहे. कुणीकडून तरी हें श्रेय माझ्या पदरीं पडलं पाहिजे.

**केशी०**:—माझ्या नव्हे, आमच्या पदरीं पडलं पाहिजे.

**नारद०**:—हो ! तुमच्या दोघांच्या पदरींच पडलं पाहिजे. मग आतां विलंब करूं नका. पौंड्रकाला ही गोष्ट न कळवितां असेचे असे निघा.

**केशी०**:—ठीक आहे. शिशुपाल ! चल, त्या कृष्णाचा नाश पौंड्रकाच्या पूर्वींच केला पाहिजे.

**शिशु०**:—मुनिवर्य, तुमचे उपकार आम्हीं फेडल्याशिवाय राहणार नाहीं. ( जातात. )

**नारद०**:—नमो भगवते वासुदेवाय ! हें एक ठीक झालं ! या मूर्खांची लवकर समजूत पटली म्हणून बरं ! नाहींतर मोठी पंचाईत झाली असती. वाहवा ! पुरुष पुरुषोत्तमाच्या उत्तरार्धाला आतां खरा रंग भरला आहे. तिकडे पौंड्रक तर आपलं मरण जवळ जवळ आणतो आहे. भगवंताच्या कानीं ही सर्व हकीगत घातलेलीच आहे. पुष्पवतीची समजूत घालून तिला धीरहि दिला. सात्यकी—

**सात्यकी०**:—काय आज्ञा आहे मुनिवर्यांची !

**नारद**:—शिशुपाल आणि केशीराज आतांच सैन्याची जमवाजमव करण्याकरतां गेले आहेत. त्यांना रस्त्यांतच अडकवून ठेव. इतक्या अवधींत पुरुष

पुरुषोत्तमाच्या लढ्याचा शेवट होईल. जा, ही कामगिरी कानासकोन न लागतां झाली पाहिजे.

**सात्यकी०**:—त्याची मुळींच काळजी करूं नका. प्रभूंना हें निवेदन करून जातों.

**नारद०**:—नको नको! तें मी निवेदन करीन. तूं असाच्या असा रथांतून जा.

**सात्यकी०**:—ठीक आहे. ( जातो )

**नारद०**:—चला, दुसरी एक काळजी मिटली. खरोखर माझं अंतःकरण आनंदानं प्रफुल्लित झालं आहे. भगवंताच्या सेवेचं पारणं विजयीपणानं फिटेल यांत शंका नाहीं. दोन कृष्णांच्या लढ्याचा शेवट पाहण्याकरतां कुरुष आणि द्वारका येथील प्रेक्षक अगदीं उतावीळ झाले असतील. भगवंता! तुझ्या लीलांचं रहस्य कुतुहल करण्यासारखंच आहे.

**पद**

**लीला तव माधवा, ना समजे मनुजा नंदकिशोरा ॥**
**वेद श्रुती स्मृती स्तवीती तव गुण व्यर्थ मम गीरा ॥ धृ ॥**
**सुष्टतारी, दुष्टमारी, गाजे नांव उदारा ॥**
**शुभ अभिदान करी गुणगान तुजवीण व्यर्थ पसारा ॥ १ ॥**

( जातो )

---

## प्रवेश दुसरा

**स्थळः**—[ वृषभकर्णाचं घर ]

**पात्रें**:—[ अनुमती, वृषभकर्ण, विचित्रवीर्य, धेनुमती. ]

**अनु०**:—धेनुमतीनं सांगितल्याप्रमाणं, या विचित्रवीर्याची चांगलीच फजिती केली पाहिजे. याला फसवून त्याच्या मूर्खपणाचं बक्षीस त्याला चांगलंच मिळवून दिलं पाहिजे. या गुढघ्याला बाशींग बांधणाऱ्या नवरदेवाचं चांगलं हंसं केलं पाहिजे. पुरुषांची जातच मेली लोंचट; स्त्री पाहिली कीं मेल्यांच्या तोंडाला पाणी सुटलंच! इश्श मेलं! असली कसली मेल्यांची रीत! या विचित्रवीर्यासारखे पुरुष जन्माला तरी कां येतात हेंच बाई मला समजत नाहीं! अगबाई! आलीच कीं

पुरुषांची खरवड ! अहाहा, बाळाचा चेहरा तर नेहमींच सुतकी ! सदान् कदा संकटाच्या सायंकाळचा देखावा ! अमावास्येचा सम्राटच ! आनंद तर मेल्याला माहीतच नाहीं ! या म्हटलं सेनापती ! पण थांबा अं ! बाहेरून आलांत तेव्हां म्हटलं दृष्ट काढून घरांत घेतें.

**विचित्र०**:—हा काय योगायोग आहे कुणाला ठाऊक; तिच्याऐवजीं आज हीच माझ्या स्वागताला दिसते आहे. हें कांहीं वाईट नाहीं म्हणा. सत्यभामा नाहीं तर रुक्मिणी. ठीक आहे. धेनु रास प्रतिकूल असली तर ही कन्या रास तरी अनुकूल आहे म्हणायची.

**अनु०**:—हं ! चला आटपा !

**विचित्र०**:—इतक्यांत आटपूं म्हणतेस ! आटपण्याचं तत्त्व मान्य, पण कालमर्यादेचा तपशील अमान्य.

**अनु०**:—बसा पाहूं खालीं ! पण नको, उभेच रहा. उभ्यानंच दृष्ट काढतें.

**विचित्र०**:—उभ्यानंच ?

**अनु०**:—हो ! लग्नाच्या उभ्या उमेदवारीची उभ्यानंच दृष्ट काढली पाहिजे. धेनुमतीनं मला सांगितलं आहे.

**विचित्र०**:—कुणी ? तिनं, माझ्या तिनं ? ठीक. तर मग मी एका पायावर उभा राहतों. तूं बेलाशक माझी दृष्ट काढ. पण थांब अं ! दृष्ट काढण्यापूर्वी मला असं सांग कीं, दृष्ट लागण्यासारखं माझं स्वरूप आहे का ?

**अनु०**:—हें काय विचारतां बाई ! तुमचं स्वरूप दृष्ट लागण्यासारखंच आहे. हें बाणासारखं नाक; ही चबुतऱ्यासारखी छाती, रथाच्या चाकासारखे कान; हत्तीसारखे डोळे; आणि उंटासारखी मान, इतकी स्वरूपाची तयारी असल्यावर कुणालाहि तुमची दृष्ट लागणारच. म्हणून म्हणतें. काढूं द्या तुमची दृष्ट !

**दृष्ट दृष्ट मी काढीतें काढीतें पुरुषाची कज्जल स्वरूपाची ॥ धृ० ॥**
**दिसतो हा पुरुष पुरुष भारी ग नवलाचा शकुनी शहाण्याचा ॥**
**बघतां स्वरूपातें रुपातें पळती नरनारी योग्य न संसारीं ॥**
**नटला नंदी जसा जसा बाई गडी ग हौशेचा सजला शंभूचा ॥**
**आला कां नकळे नकळे हा नरजन्माला कुलदीपक असला ॥**
**अवगुणी गुणी शोभे शोभे ग पुरुषाची खरवड नवलाची ॥**

**घेनु०**:—(हातांत मशाल घेऊन) **दृष्ट मी उतरीतें उतरीतें मूर्खाची अपूर्ण पुरुषाची ॥ १ ॥**

**विचित्र०**:—अरे! ही कसली नवी पद्धत, ही मशाल कशाला?

**अनु०**:—खरंच गडे घेनू! ही मशाल ग कशाला!

**घेनु०**:—या मशालजीच्या हातीं द्यायला.

**विचित्र०**:—हाताचें तत्त्व मान्य, पण मशालजीचा तपशील अमान्य.

**घेनु०**:—अग यांची दृष्ट अशा छोट्या निरांजनांनीं कां काढायची! हे भावी सेनापती ना! त्यांची दृष्ट या मोठ्या मशालीनंच काढली पाहिजे.

**विचित्र०**:—तें असूं दे. या मशालींतच आपण लग्नसमारंभ उरकून घेऊं या.

**घेनु०**:—कुणाशीं!

**विचित्र०**:—तुझ्याशीं अगर इच्याशीं, अगर दोघींशीं.

**घेनु०**:—मी कधीं–कधीं लगीन करणार नाहीं.

**विचित्र०**:—तुझा निकाल लागला. पण तुझा!

**अनु०**:—मी बाई लगीन केल्याशिवाय कधीं–कधीं राहणार नाहीं.

**विचित्र०**:—तत्त्व मान्य, घेनु नाहीं तर अनु आहेच किनई! चल आपणच लग्न उरकूनन घेऊं! घेनू, तूं हो हिची करवली!

**अनु०**:—अहो पण माझी एक अट आहे.

**विचित्र०**:—अटीतटीचा सामनाच दिसतो आहे. तत्त्व मान्य.

**अनु०**:—माझ्याशीं लग्न करणारा कृष्णभक्त असला पाहिजे. आहांत का कृष्णभक्त?

**विचित्र०**:—मोटाच प्रश्न पडला आहे! नोकरी कीं पत्नी! कृष्णभक्त झालों नाहीं तर लग्न होत नाहीं. लग्न झालं तर नोकरी नाहीं. नोकरी कीं लग्न! लग्न कीं नोकरी!

**घेनु०**:—कां? विचार कसला करतां?

**अनु०**:—चटकन् सांगा!

**घेनु०**:—पटकन् बोला!

**अनु०:**—मला वेळ नाहीं.

**धेनु०:**—मलाहि थांबायला सवड नाहीं.

**अनु०:**—जाऊं का मी ?

**धेनु०:**—हो उगीच वेळ तरी कशाला दवडायचा तो ? चल ग अनु !

**विचित्र०:**—थांब, थोडा वेळ थांब !

**धेनु०:**—वेळ आहे मोलाची नी नवरी आहे जडावाची !

**विचित्र०:**—हं ! ठरलं !

**धेनु०:**—काय ठरलं !

**विचित्र०:**—तुझ्या माझ्या लग्नाचं ठरलं.

**अनु०:**—पण अटीचं नाहीं समजलं !

**विचित्र०:**—तत्त्व मान्य. मी कृष्णभक्त झालों. आजपासून—केवळ लग्नाकरतां मी कृष्णभक्त झालों.

**वृषभ०:**—(प्र. क) अनुचरांनों ! पकडा याला. हा गुन्हेगार आहे. (पकडतात.)

**धेनु०:**—झालांत ना चतुर्भुज ?

**वृषभ०:**—तत्त्व मान्य. चतुर्भुज झाल्याचं तत्त्व मान्य, पण तपशील अमान्य.

**वृषभ०:**—कृष्णभक्त झालांत काय ! सर्व कृष्णभक्तांना पकडून त्यांना अग्निकुंडांत जाळण्याचा मला भगवान् वासुदेवाचा हुकूम आहे. हा हुकमाचा ताबेदार त्याची अंमलबजावणी करणार आहे.

**विचित्र०:**—अहो पण मी तुमचा जांवई आहें ना ! मी मेलों तर तुमच्या मुलीचं लग्न माझ्याशीं कसं होणार !

**वृषभ०:**—तें मी पाहीन !

**विचित्र०:**—पण मला कसें दिसेल ?

**वृषभ०:**—तें कांहीं नाहीं ! चला असे पुढें.

**विचित्र०:**—धेनू, अग बापाला कांहीं तरी सांग. भावी पतिव्रते ! या नवऱ्याकरतां या सासऱ्याचे पाय तरी धर.

**धेनु०:**—बाबा आहेत—

**वृषभ०:**—हुकमाचा ताबेदार.

**धेनु०:**—हो! तेव्हां ते माझं कसं ऐकतील.

**विचित्र०:**—अनु, तूं तरी सांग—

**अनु०:**—मी नाहीं सांगायची जा—

**विचित्र०:**—बरं! अविवाहितपणींच मरण असलं तर त्याला तूं तरी काय करणार?

**वृषभ०:**—येतां कीं ओढून नेऊं?

**विचित्र०:**—येण्याचं तत्त्व मान्य, पण एकट्याचा तपशील अमान्य!

**वृषभ०:**—म्हणजे काय!

**विचित्र०:**—यांना घेऊन जायची परवानगी तरी द्या!

**वृषभ०:**—कुणाला यांना!

**विचित्र०:**—होय होय! यांना! म्हणजे माझ्या मनाचं तेवढंच समाधान होईल.

**वृषभ०:**—तें कसं?

**विचित्र०:**—लग्न तर आतां होत नाहींच. तेव्हां मरतांना दोघी कुमारिकांसह मेलों म्हणजे एका लग्नाचं समाधान तरी होईल. हं चला ग माझ्याबरोबर.

**वृषभ०**—महाशंख आहांत! चला एकदम. (जातात.)

**धेनु:**—चांगली मौज झाली बाई!

**अनु०:**—असल्या पुरुषांना अशीच शिक्षा पाहिजे.

**पद**—गजल.

**असें कसें हें प्रेम मिळे नरा मुळींना रसिकासी मान्य ॥**
**सखे बाई ॥ मुळींना रसिकासी मान्य ॥ ध्रु० ॥**
**पती तोची मानी स्त्री जीव जाणी प्रेमें गणीं स्त्रीसमान ॥ १ ॥**

---

## प्रवेश तिसरा

**स्थळः**—उद्यान.

**पौंड्रकः**—परवां मी शिक्षा दिलेल्या लोकांना त्या कृष्णानं अचानक सोडून दिलं ! हें ऐकल्यापासून माझ्या अंगाची नुसती लाही लाही झाली आहे. माझ्या वर्मावरच त्या पुंडानं घाव घातला. कांहीं हरकत नाहीं. हा पौंड्रक असा लेच्यापेच्या मनाचा नाहीं. सोडलेल्या साऱ्या गुन्हेगारांना पकडून आणवून माझ्या डोळ्यांसमोर अग्निकुंडांत जिवंत जाळून टाकतों. माझ्या राज्यांत एकहि कृष्णभक्त जिवंत राहतां कामा नये. हें कार्य झाल्यावर कीरीटकुंडलं न देणाऱ्या कृष्णाला युद्धाच्या आव्हानाप्रमाणें या जगांतून नाहींसा करतों. वृषभकर्ण !

**वृषभ०ः**—हुकमाचा ताबेदार तयार आहे सेवेला.

**पौंड्रकः**—सांगितल्याप्रमाणें कृष्णभक्तांना पकडून आणलंतना !

**वृषभ०ः**—होय महाराज !

**पौंड्रकः**—आणा त्यांना समोर.

**वृषभ०ः**—अनुचरा ! घेऊन ये साऱ्यांना !

**पौंड्रकः**—काय ! यांत आपल्या दरबारचे हे भावी सेनापतीहि आहेत ! कृष्णप्रेमाचं विष आपल्याहि दरबारांत पसरलं ? ठीक आहे. वृषभकर्ण ! एकेकाला उचलून त्या अग्निकुंडांत फेकून द्या. कृष्णभक्तांचा नायनाट मला माझ्या डोळ्यांनीं पहावयाचा आहे.

**लोकः**—महाराज ! आम्ही निर्दोषी आहोंत.

**विचित्र०**—तत्त्व मान्य, तपशील अमान्य.

**पौंड्रक०ः**—तें कांहीं नाहीं, टाका एकेकाला ! या साऱ्यांचा नाश करून, मगच त्या कृष्णाचा निःपात करायचा आहे. माझ्या आज्ञेचा भंग करून, माझ्या शत्रूची स्तुति करणाऱ्यांनां असंच शासन मिळालं पाहिजे. वृषभकर्ण ! पहातां काय तोंडाकडे ? पकडा एकेकाला आणि फेकून द्या त्या अग्निकुंडांत. कृष्णभक्ति करतात काय !

( वृषभ एकेकाला कुंडांत टाकतो. पौंड्रक आनंदानें हंसतो. )

वाहवा ! आज माझ्या डोळ्यांचं समाधान झालं ! माझ्या शत्रूला सामील होणाऱ्या अपराध्यांना चांगलंच बक्षीस मिळालं !

**पुष्प०:**—( प्र. क. ) महाराज ! महाराज ! हें काय चालवलं आहे ! हा आसुरी अत्त्याचार महाराजांना शोभत नाहीं. महाराज ! ही आपली प्रजा ना ! प्रजाजनांचं सम्राटानं संरक्षण करायचं कीं त्यांना अग्निकाष्ठ भक्षण करायला लावायचं ! महाराज ! अशानं कुरुषपूरचा लौकिक मावळतीला लागेल ना ! महाराज ! अशानं पौंड्रपूरच्या सम्राटाची जगांत छीःथू होईल ना ! महाराज या लोकांना क्षमा करा ! महाराज—

**पौंड्रक०:**—मला उपदेश करतां काय ! राणीसाहेब, ही सर्व तुमचींच कारस्थानं आहेत. आमच्या विरुद्ध आमच्या शत्रूचा लौकिक वाढविण्याला तुम्हींच कारण झालां आहांत ! त्या कुटिल कृष्णाविरुद्ध आम्हीं आज्ञा काढल्या त्याची तुम्हीं या लोकांना पायमल्ली करायला लावलीत ! तुमची उपेक्षा आम्ही या पुढं करणार नाहीं !

**पुष्प०:**—महाराज ! माझ्या हातून अपराध झाला असेल तर आपण मला वाटेल तें शासन करा. या अग्निकुंडांत या नश्वर देहाला पावन करा, पण महाराज ! या निरपराधी लोकांची ही अमानुष शिक्षा थांबवा !

**पौंड्रक०:**—वृषभकर्ण ? यांना देखील या कुंडांत टाका !

**वृषभ०:**—महाराज—या राणीसाहेब आहेत.

**पौंड्रक०:**—तें मला देखील माहीत आहे. राणीसाहेब, असल्या म्हणून काय झालं ! अपराधाबद्दल सर्वांना सारखंच शासन मिळालं पाहिजे. टाकतां किंवा नाहीं ?

**वृषभ०:**—हुकमाचा ताबेदार तयार आहे. पण—महाराज—

**पौंड्रक०:**—तें कांहीं नाहीं. मीच हें कृत्य करतों !

**पुष्प०:**—देवा ! आज पतिव्रतेच्या जन्माचं सार्थक झालं ! पतीच्या हातून पत्नीला येणारं मानाचं मरण या दासीला लाभलं ! द्वारकेच्या परमेश्वरा ! तुझ्या चरणीं दासीचा अखेरचा प्रणाम आहे.

( पौंड्रक पुष्पवतीला कुंडांत टाकतो. )

वाहवा ! आतां सर्व शत्रू नाहींसे झाले !

**नारदः**—( प्र. क. ) नमो भगवते वासुदेवाय !

**पौंड्रकः**—मुनिवर्य ? आतां एका क्षणांत त्या कलंकी कृष्णाचा नाश होणार आहे !

**नारदः**—अद्याप एक क्षण तरी अवकाश आहे ना !

**पौंड्रकः**—हो आहे. त्याच्या येण्याचीच खोटी आहे.

**नारदः**—म्हणजे कृष्ण अजून इथं आला देखील नाहीं ना !

**पौंड्रकः**—तो कसला येतो माझ्या पुढं. येण्याला त्याला तोंड आहे कुठं !

**नारदः**—तुझ्या आव्हानानं तो घाबरला असावा !

**पौंड्रकः**—बरोबर आहे ! तुमचा अंदाज बरोबर आहे. तो घुंगुरटा माझ्याशीं युद्ध करायला तयारच होणार नाहीं.

**नारदः**—हो, असंहि गृहीत धरायला हरकत नाहीं. पण राजा ! या बोलण्यांत मी तुला एक गोष्ट सांगायची विसरलोंच.

**पौंड्रकः**—ती काय !

**नारदः**—तुझे साथीदार केशीराज आणि शिशुपाल एकाएकीं आपल्या नगरीला निघून गेले. ऐनवेळीं त्यांनीं तुला दगा दिला ! वेळेला कोणीहि उपयोगी पडत नाहीं हेंच खरं !

**पौंड्रकः**—जाऊंदे त्यांना ! त्यांच्या मदतीवर मी मुळींच अवलंबून नव्हतों. पौंड्रकाच्या बाहूंत इतकी प्रबल शक्ति आहे कीं, एकच कृष्ण काय पण हजारों कृष्ण, हजारों राजे त्याला सहजच निर्वाणपदाला पोंचवतां येतील. या पौंड्रकाला कुणाच्याहि मदतीची पर्वा नाहीं. लाखों वीरांना एका बुक्कीनं जागच्या जागीं ठार करीन. कृष्णभक्तांना जसं या कुंडांत जिवंत जाळलं तसं अनेक राजांना, अनंत कृष्णांना जाळून टाकीन.

**नारदः**—राजा ! आज असा पराक्रम केलास !

**पौंड्रक०ः**—असा ? यांत काय आहे. आजपर्यंत या पौंड्रकानं असे कितीतरी पराक्रम केले आहेत. युद्धभूमीवर अनेक वीरांना लोळवलं आहे ! मल्लयुद्धांत

चाणूर मुष्टीकांनाहि ज्यांनीं चीत केलं अशा मस्त मल्लांना एका दमांत उखडून टाकलं आहे. धनुर्विद्येची घमेंड मारणाऱ्या धनुर्धाऱ्यांना धनुष्याच्या एका टणत्कारानं धारातीर्थावर कायमचं लोळवलं आहे.

**नारदः**—तूं तसा अतुल पराक्रमी आहेस यांत शंकाच नाहीं आणि म्हणूनच तर मी तुला या महत्त्वाच्या कार्यांत शुद्ध भावनेनं मदत करण्याचं पत्करलं. यांत तुला विजय मिळाला म्हणजे झालं.

**पौंड्रक०ः**—विजय! विजय तर हटकून मिळणार. नारदा! विजय म्हणजे या पौंड्रकाच्या हातचा नुसता मळ आहे. त्या कृष्णाला, त्या गवळ्याच्या पोराला एका दमांत उखडून टाकीन! तो आपल्याला राजांचा राजा म्हणवून घेतो; पण हा पौंड्रक तो तोतया राजांचा राजा मल्लयुद्धांत धारातीर्थी पोंचवील! राजांचा राजा म्हणे! अनेक मूर्ख राजांचे मुगुट त्याला अभिवादन करतात म्हणून राजांचा राजा असं डौलानें म्हणवतो. नारदा? असले अनेक राजे माझे स्तुतिपाठक आहेत. मीच खरा राजांचा राजा नाहीं काय?

**नारदः**—( स्व. ) तें लवकरच समजेल.

**पौंड्रक०ः**—पण अद्याप तो उन्मत्त तोतया कसा आला नाहीं! ही माझी गदा त्याच्या मस्तकांतील रक्त प्राशन करण्याकरतां पहा कशी उत्सुक झाली आहे. कुठं आहे तो गवळ्याचा घमेंडखोर पुंड!

**कृष्ण**—( प्र. क. ) हा पहा तुझ्यासमोर उभा आहे.

**नारदः**—नमो भगवते वासुदेवाय!

**पौंड्रक०ः**—ठीक आहे! मी तुझीच वाट पहात होतों. ही गदा तुझ्या रक्ताकरतां आतुर झाली आहे.

**कृष्णः**—माझीहि गदा तुझ्या रक्ताकरतां तृषाक्रांत झाली आहे! अधमा! मूर्खपणानं माझ्याशीं स्पर्धा केल्याचा जाब या माझ्या गदेला दे!

**पौंड्रकः**—खोटा कृष्ण म्हणवून मिरविणाऱ्या तुझ्यासारख्या गवळ्याला उत्तर द्यायला गदा कशाला! नुसत्या बाहूंनीं तुला निर्वाणपदाला पाठवतों. पुरुषोत्तम म्हणवून जगभर ख्याति करून घेणाऱ्या तुझ्यासारख्या कुटिल माणसाला या जगांतून घालवायला मला एका चुटकीचा देखील वेळ लागणार नाहीं. तुझ्या

भक्तांना ज्याप्रमाणं जाळून टाकलं त्याप्रमाणें तुलाहि एका निमिषांत जाळून टाकतों.

**कृष्णः**—उन्मत्ता ! जोंपर्यंत हा कृष्ण जिवंत आहे तोंपर्यंत त्याच्या कोणत्याहि भक्ताला, कुणालाहि ठार मारतां येणार नाहीं.

**पौंड्रकः**—पहा ! उन्मत्ता ! या अग्निकुंडांत पहा !

**कृष्णः**—तूंच पहा !

**नारदः**—नमो भगवते वासुदेवाय !

**पौंड्रकः**—हरामखोरा ! जादू करतोस काय ! थांब, या धनुष्यानं तुला ठार करून टाकतों. या तुझ्या भक्तांच्या देखत तुझी चांगलीच फजिती करतों. चल तयार हो.

( धनुष्यांनीं लढतात व नंतर गदायुद्ध होतें )

छे ! हें उपयोग नाहीं. तुला मल्ल युद्धांतच चीत केलं पाहिजे. घमेंडखोरा ! **राजांचा राजा** म्हणून मिरवतोस काय ! पण मीच खरा राजांचा राजा आहें. मी खरा भगवान् वासुदेव असून तूं तोतया वासुदेव आहेस ! त्या तुझा नायनाट मला केलाच पाहिजे ! चल आटप ! मल्लयुद्धाला तयार हो ?

**कृष्णः**—अरे ! मी तर केव्हांच तयार आहें !

**पुष्प०ः**—देवा ! या दासीकडे पाहून तरी हें युद्ध थांबवा !

**पौंड्रकः**—राणीसाहेब ! दूर व्हा ! माझ्या प्राणाची भिक्षा याच्याजवळ कशाला मागतां !

**पुष्प०ः**—भगवंता !

**पदः**—( राग भैरवी, ताल गजल )

**प्रणती पदिं करी दासी ही यदुनाथ मुरारी ॥**
**नच ज्ञात तुझें ब्रिद विभो विश्वविहारी ॥ धृ० ॥**
**तारक तूं सुष्टांचा हरी मधुनाथ मुरारी ॥**
**उमजे ना तुझें ध्येय श्रीहरी ॥ १ ॥**

**कृष्णः**—पुष्पवती ! दुष्टांचं निर्मूलन झालंच पाहिजे. माझ्या या व्रतापासून मी मुळींच ढळणार नाहीं. पुरुषोत्तमाशीं कुटिल बुद्धीनें स्पर्धा करणाऱ्या या

पुरुषाला मोक्षाचा मार्ग मला दाखवलाच पाहिजे. पौंड्रक हा माझा विरोधी भक्त आहे. पण त्याची भक्ति भलत्याच मार्गाची अयोग्य अशीच आहे. पुरुषानं पुरुषोत्तमाशीं बेलाशक प्रतिस्पर्धा करावी. परंतु पौंड्रकानं स्पर्धेचा जो मार्ग अंगिकारला होता तो मार्ग अनुचित असाच होता. पुरुषानं पुरुषोत्तम बनणं हीच खरी स्पर्धा होय. परंतु पौंड्रकानं या मार्गाची पायमल्ली करून पुरुषोत्तमाचा नायनाट करण्याच्या स्पर्धेचा मार्ग स्वीकारला आणि हाच त्याचा मार्ग त्याच्या नाशाला कारणीभूत झाला आहे. कोणत्याहि पुरुषानं पुरुषोत्तम होण्याचा असा प्रयत्न करूं नये. स्वतः पुरुषोत्तम बनण्याची तपश्चर्या करावी आणि मग पुरुषोत्तम व्हावं. पौंड्रकाच्या-या तोतया पुरुषोत्तमाच्या, या खोट्या राजांच्या राजाच्या लढ्याचा शेवट करून मी हेंच प्रमेय अखिल विश्वाला निवेदन करणार आहें.

**पौंड्रकः**—शब्दाची करामत पुरे ! चल तयार हो !

**कृष्णः**—चल मी तयार आहें.

( मल्लयुद्ध होतें. कृष्ण पौंड्रकाला ठार मारतो. )

**नारदः**—नमो भगवते वासुदेवाय ! देवा ! खरा कृष्ण कोण ! खरा **राजांचा राजा** कोण हें आज तूं अखिल विश्वाला पटवून दिलेंस !

**नमो भगवते वासुदेवाय !**

**अंक तिसरा पूर्ण.**

---